

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १९ वे ] जुलै १९६६ [ अंक १०



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष एकोणिसावे अंक दहावा

# नवभारत

जुलै १९६६

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९
२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )
३ चौकशी श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | .... | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ६ | | २३०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०·०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५·०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास ... ... ... | | ६·०० |
| (१०) नवमानवतावाद ... ... ... | | २·५० |
| (११) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३·०० |
| (१२) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | (प्रा. सदाशिव आठवले) ... | ३·०० |
| (१३) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २·५० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| | (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | २·०० |

अनुक्रमणिका

श्री. श. श्री. पुराणिक

# कालिदास

" Through busiest streets and lonliest glens
Are felt the flashes of his pen ;
He rules amidst winter snows and when
Bees fill their hives ;
Deep in the general heart of men
His praise survives. "
— Wordsworth.

स्कॉटलंडचा कविश्रेष्ठ रॉबर्ट बर्न्स याच्या समाधीपाशी उभे राहून वर्डस्वर्थने हे उद्गार काढलेले आहेत, ते कालिदासालाही लागू पडतील. आषाढाचा पहिला दिवस हा कालिदासाचे पुण्यस्मरण करण्याचा दिवस असला, तरी सर्व काळ, सर्व ऋतु त्याचेच आहेत; तो सर्व जगाचा नागरीक आहे, त्याला स्थळकाळाचे बंध नाहीत, म्हणूनच जर्मनीचा महाकवी गटे त्याचे ' शाकुंतल ' वाचून आनंदाने नाचला आणि म्हणाला की, ' येथे स्वर्ग आणि पृथ्वी याचा संगम झालेला आहे. ' वर्डस्वर्थने बर्न्सबद्दल म्हटल्याप्रमाणे अवघ्या मानवजातीचे हृदय हेच कालिदासाचे घर आणि सिंहासन आहे; आणि त्याला हजार वर्षे होऊन गेली तरी नुकत्याच उमललेल्या कल्हारपुष्पाप्रमाणे टवटवीत असलेल्या त्याच्या चिरयौवना वाङ्मय-सुंदरीचे लावण्य कणाने की क्षणानेही ढळलेले नाही. बीजातून मोहोराने आणि फळांनी डवरलेला आम्रवृक्ष बहरावा, त्याप्रमाणे ज्यातून त्याचे अमर-सारस्वत बहरले, त्या त्याच्या संपन्न बहुरंगी आणि सहृदय व्यक्तिमत्त्वाचा शोध घेणे हे निश्चितच उद्बोधक ठरेल यात शंका नाही. त्या दृष्टीने त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे विश्लेषण करणे या उद्देशाने पुढील थोडा प्रपंच केलेला आहे, कारण वाङ्मय हा केवळ जगाच्याच नव्हे तर कलावंताच्या व्यक्तिमत्त्वाचा पारदर्शक आरसा– A mirror held to Nature– होय.

हे समग्र मानवी जीवित हा कलावंताचा विषय आहे. अमरतटिनीच्या तीरावर किंवा हिमालयाच्या गिरिगह्वरात ध्यानस्थ बसलेल्या आत्मरत आत्मक्रीड अशा मूठभर महात्म्यांची गोष्ट सोडली, तर सामान्य स्त्री–पुरुषांचा संसार हे या मानवी जीविताचे सार-सर्वस्व आहे; कारण ' संन्याशाचा संसार ' हा वदतो–व्याघात आहे, विरोधाभास आहे, काव्याचा अलंकार आहे, व्यवहारातील अपवाद आहे. म्हणून सामान्य स्त्री–पुरुषांच्या भावनांच्या संघर्षातून निर्माण होणारे ' प्रतिपर्वनवरसोदय ' असे जीवन–चरित्र हा नाट्याचा व काव्याचा विषय होय. " **त्रैगुण्योद्भवमत्र लोकचरितं नानारसं दृश्यते ।** " ; त्यांच्या रागद्वेषांच्या आडव्या–उभ्या आणि रंगीबेरंगी धाग्यांनी हे जीवनाचे महावस्त्र विणलेले आहे; या जीवनाबद्दल ज्याला सहानुभूति नाही तो थोर सारस्वत प्रसवू शकणार नाही. ही सहानुभूति कालिदासापाशी उदंड आहे. स्त्री ही संसाराची अधिष्ठात्री देवता; तिच्या सौंदर्याचे वर्णन करताना कालिदास इतका रंगून जातो, की त्या बाबतीत तो फ्रेंच लेखकांनाही हार जाणार नाही. वल्कलांनीसुद्धा अधिक मनोज्ञ वाटणाऱ्या शंकुतले-बद्दल तो म्हणतो– " इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी किमिव हि मधुराणां मण्डनं नाकृतीनाम् । " ; उर्वशीच्या जन्माच्या वेळेस चंद्र की वसंत, की मदन प्रजापति झाला असा त्याच्या पुरूरव्याला संशय पडतो कारण, " वेदाभ्यासजडः कथं नु विषयव्यावृत्तकौतूहलो । निर्मातुं प्रभवेन्मनोहरमिदं रूपं पुराणो मुनिः ! " ; त्याची यक्षपत्नी तन्वी आहे, श्यामा आहे, शिखरिदशना आहे, पक्वबिम्बाधरोष्ठी आहे. वसंताच्या








फुलांची आभरणे धारण करणारी, केसर-फुलांची मेखला ल्यायलेली, सुगंधी श्वासांनी मोहित होऊन तिच्या भोंवती भ्रमणाऱ्या भ्रमराला लीलाकमलाने निवारणारी त्याची पार्वती प्रत्यक्ष रतीलासुद्धा लाजवणारी आहे. कालिदासाच्या नायिका या सौंदर्याने आणि यौवनाने रसरसलेल्या आहेत.

साहजिकच, शृंगार हा कालिदासाचा प्राण आहे. त्याच्या वाङ्मयात तो ओतप्रोत भरलेला आहे. रोमरोमात भिनलेला हा शृंगार इतका नैसर्गिक आणि अनावर आहे की, पुरुषांच्या आतड्यांची माळ घातलेल्या, आणि काळ्या ढगाप्रमाणे भेसूर असलेल्या ताटकेच्या वधाचेही वर्णन तो शृंगाराच्या परिभाषेत करतो—

" राममन्मथशरेण ताडिता दुःसहेन हृदये निशाचरी।
गन्धवद्रुधिरचन्दनोक्षिता जीवितेश वसतिं जगाम सा ॥

नुकत्याच प्राप्त झालेल्या पृथ्वीवर राज्य करणाऱ्या अजाचे वर्णनही असेच आहे— " सदयं बुभुजे महाभुजः सहसोद्वेगमियं व्रजेदिति। अचिरोपनतां स मेदिनीं नवपाणिग्रहणां वधूमिव ॥ " ज्याला राजधर्मासारख्या गंभीर आणि राक्षसवधासारख्या उग्र प्रसंगाचे वर्णन करतानाही शृंगाराचा मोह आवरला नाही, तो शृंगाराचे वर्णन करताना किती शृंगारिक बनत असेल याची कल्पनाच केलेली बरी. त्याची ' विक्रमोर्वशीय आणि मालविकाग्निमित्र ' ही नाटके म्हणजे अंतःपुरातल्या अगणित स्त्रियांचे पति असलेल्या राजांच्या प्रणयलीला वर्णन करणाऱ्या गाथा-सप्तशतीच आहेत. मेघदूतांतील सूर्य आणि नलिनी, मेघ आणि विद्युत् ही अशीच जोडपी आहेत; मेघाची विद्युत् ही तर ' लग्नाची बायको ' आहेच, तिच्यापासून त्याचा कधीही वियोग होऊ नये अशी यक्षाची ऊर्फ कालिदासाची प्रार्थना आहेच, तरीसुद्धा वाटेत लागणाऱ्या वेत्रवती, गम्भीरा, निर्विन्ध्या आदि सर्व नद्या कविराजांनी कृपावंत होऊन त्याला बहाल केलेल्या आहेत. रघुवंशाचा एकोणिसावा सर्ग अग्निवर्णाच्या शृंगारलीलांना वाहिलेला आहे; आणि कुमारसंभवाच्या आठव्या सर्गातील शिव-पार्वतींच्या शृंगाराची वर्णने काव्यशास्त्रज्ञांनी औचित्यहीन ठरवली आहेत की ज्यावर मल्लिनाथाने टीका लिहिण्याचे नाकारले असा प्रवाद आहे. मोहोळाच्या रंध्रारंध्रातून मध ठिपकावा, तसा कालिदासाच्या शब्दाशब्दातून शृंगार पाझरत आहे. याउलट भवभूति कालिदासाच्या अगदी उलट आहे. तो शृंगाराचे, युद्धाचे वर्णन करुणात करील; " गात्रैस्ते कथयन्त्यसारविधुरान् प्रायेण संसारिणः"; " प्रायेण बान्धवसुहृत्प्रियसंगमादि सौदामिनीस्फुरणचंचलमेव सौख्यम् " म्हणून निश्वास सोडील आणि म्हणेल की **"एको रसः करुण एव निमित्तभेदात् !"**

पण कालिदासाचा शृंगार हा अत्यंत पवित्र आणि वैध आहे. केवळ श्रृंगार लिहिल्याने वाङ्मय खपेल पण ते अमर होणार नाही. नपेक्षा ' अतिवास्तववादी ' अशी गलिच्छ चोपडी अक्षर साहित्याच्या पदवीला जाऊन पोचली असती. काव्याचा उद्देश हा ' शिवेतरक्षति ', आहे, ' सद्यःपरनिवृत्ति ' आहे असे म्हटले आहे. आणि कीट्स्नेही—सौन्दर्यपूजकांच्या अग्रणी असलेल्या कीट्स्नेही - म्हटले आहे की—"The great end of Poesy that it should be a friend *To soothe the cares, and lift the thoughts of man.* " तेव्हा केवळ सौंदर्य नव्हे तर शिव आणि शुचि असलेले सौंदर्य हा काव्याचा विषय आहे. कालिदासाचा श्रृंगार हा ' नव्य काव्यातील ' असला तरी ' नव-काव्या'तील नाही. तो प्रेमात आणि निष्ठेत निर्माण होणारा आहे. " **धर्माविरुद्धो भूतानां कामोऽस्मि भरतर्षभ** " अशा प्रकारचा तो ईश्वरस्वरूप श्रृंगार आहे. शृंगार हे शरीर असले तर निष्ठा हा त्याचा प्राण आहे; तो पाया असेल तर हा कळस आहे; ते मूळ असेल तर हा वृक्ष आहे. तो सीतारामाचा श्रृंगार आहे, यक्ष-यक्षपत्नींचा श्रृंगार आहे, शिव-पार्वतींचा श्रृंगार आहे. अज-इंदुमतींचा शृंगार आहे. विवाहाने त्या श्रृंगाराला पावित्र्य आलेले आहे, आणि त्या श्रृंगाराने विवाहाला सौंदर्य आलेले आहे.

पतीची पत्नीवरील आणि पत्नीची पतीवरील नितांत निष्ठा हे या श्रृंगाराचे सारसर्वस्व आहे. त्याचा शिव पार्वतीला म्हणतो— " मुञ्च कोपमनिमित्तकोपने सन्ध्यया प्रणमितोऽस्मि नान्यया । **किं न वेत्सि सहधर्मचारिणं चक्रवाकसमवृत्तिमात्मनः** ॥ " त्याच्या अजाला इन्दुमतीच्या निधनानंतर अवघे









अनुक्रमणिका

जग शून्य झाले. ती त्याची गृहिणी, सचिव, सखी, प्रियशिष्या-सर्व काही होती. तिला हिरावून नेणाऱ्या मृत्यूने त्याचे काय हरण केले नाही ? गजान्तलक्ष्मी दाराशी झुलत असताना आणि विलोभनांना अंत नसताना त्याचे सर्व सुख इंदुमतीच्या ठिकाणी केंद्रित झालेले होते. **"विभवेऽपि सति त्वया विना सुखमेतावदजस्य गण्यताम् । अहृतस्य विलोभनान्तरैर्मम सर्वे विषयास्त्वदाश्रयाः ॥"** लोकापवादाने सीतेचा त्याग करणाऱ्या रामाचा सीता-त्यागही भूषणीय होता, कारण यज्ञकृत्ये करतानाही दुसरी बायको त्याने केली नाही, तर यजमान-पत्नीच्या जागी सीतेच्या सोन्याच्या प्रतिमेची स्थापना केली. असा त्यागही अलौकिक आणि असे प्रेमही अलौकिक. **"श्लाघ्यस्त्यागोऽपि वैदेह्याः । अनन्यजानेः सैवासीत् यस्माज्जाया हिरण्मयी !"** त्याचा यक्षही आपल्या पत्नीचे **"जीवितं मे द्वितीयं"** असे वर्णन करतो, आणि विरहाने प्रेम ओसरत नाही तर अधिक दृढ होते असे म्हणतो– "स्नेहानाहुः किमपि विरहे ध्वंसिनस्ते ह्यभोगा– **दिष्टे वस्तुन्युपचितरसाः प्रेमराशी भवन्ति !**" प्रीतीचे इतके उदात्त आणि हृदयंगम चित्रण जगाच्या वाङ्मयात तरी अन्यत्र कोठे सापडेल की नाही याची शंकाच आहे. यात्राव्रतीत भवभूतीप्रमाणेच कालिदासाचीही "प्रेयो मित्रं बन्धुता वा समग्रा सर्वे कामाः शेवधिर्जीवितं वा । स्त्रीणां भर्ता धर्मदाराश्च पुंसां" अशी श्रद्धा आहे.

कालिदासाच्या नायिका ह्या त्याच्या साहित्याच्या निस्तुल अलंकृति आहेत. सीतेला रामाने टाकल्यावरती तिने रामाला पाठवलेला संदेश हे स्त्रीच्या जीवनावरचे भव्योदात्त भाष्य आहे. तिने रामाला दोष दिला नाही, तर आपल्याच पूर्वजन्मीच्या पातकांचे हे फळ आले आहे म्हणून स्वतःला बोल लावून घेतला. रामाने तिचा त्याग केला तरी तिने रामाला टाकले नाही. कारण तिला रामचंद्राची तिच्यावरील निष्ठा माहीत होती. **"कौलीनभीतेन गृहान्निरस्ता न तेन वैदेहसुता मनस्तः ।"** तिची इच्छा एवढीच आहे की यापुढे सूर्यावर दृष्टि लावून उग्र तपश्चर्या करावी की पुढील जन्मी राम हाच पति मिळावा आणि त्याचा वियोग मात्र होऊ नये. **"भूयो यथा मे जननान्तरेऽपि त्वमेव भर्ता न च विप्रयोगः"** उघडच आहे, जे सापेक्ष असते व बदलत असते ते प्रेम कसले ? "*Love is not love which alters when it alteration finds.*" राम हा इतर काही असला तरी प्रथम आणि शेवटी तो **"मैथिलीपति"** आहे. रामाने टाकल्यानंतर सीतेला सर्व जीवन शून्य झाले. **"तवात्यन्तवियोगमोघ"** अशा या जीवनाची उपेक्षा करावी असा मोह झाला, केवळ उदरात असलेल्या गर्भासाठी ती जिवंत राहिली. सीता ही कारुण्याची मूर्तिमंत प्रतिमा आहे. तिच्या रूपाने भारतीय स्त्रीचा करुण आणि उदात्त आत्मा बोलत आहे. हिंदु स्त्रीच्या मांगल्याचा आणि पावित्र्याचा सीता ही चिरंतन आलेख आहे. शकुंतलेचे दुर्दैवतर सीतेहूनही घोर आहे. तिचा पति तिची ओळखच विसरून गेलेला आहे, आणि तिच्याकडे पाहून **'अनिर्वर्णनीयं परकलत्रम्'** असे उद्गार काढतो. त्याचे शब्द तिचे अंतःकरण अग्नीप्रमाणे जाळत जातात. **'पावकः खलु वचनोपन्यासः !'** हे शब्द नव्हते तर हे अंगार आहेत. पतीने तिचा केलेला त्याग हा सीतेप्रमाणे तिलाही सहन करावा लागतो, फरक इतकाच की तिचा त्याग संगमाच्या समाधानात समाप्त होतो तर सीतेच्या त्यागाचा अंत देवी वसुंधरेने तिला पोटात घेतल्यानंतरच होतो- तशीच ती पार्वती. शिवाच्या प्राप्तीसाठी तिने जाळणाऱ्या उन्हात, भिजवणाऱ्या पावसात, चावणाऱ्या थंडीत उग्र आणि घोर तपश्चर्या केली,-तिने की जिची कुसुमकोमल तनुलता कन्दुकक्रीडेनेसुद्धा क्लान्त व्हावी– **"क्लमं ययौ कन्दुकलीलयापि या तया मुनीनां चरितं व्यगाहत !"**; आणि ब्रह्मचाऱ्याचे रूप धारण करून आलेल्या शिवाने जेव्हा तिच्या जगावेगळ्या प्रेमाची, विरक्त, श्मशानवासी, कुरूप, निर्धन शिवावरच्या आसक्तीची थट्टा केली तेव्हा तिने संतापून उत्तर दिले की, तू म्हणतोस तसा तो असला तरी हरकत नाही, माझे मन त्याच्या ठिकाणी जडलेले आहे. खऱ्या प्रीतीला लोकापवादाची पर्वा नसते– **"ममात्र भावैकरसं मनः स्थितं न कामवृत्तिर्वचनीयमीक्षते !"** आणि शिवाने संतुष्ट होऊन "तपांनी विकत घेतलेला मी आजपासून तुझा दास आहे" अशा मधुर शब्दांनी तिचा स्वीकार केल्यानंतर तिची सलज्ज कृतार्थता वर्णन करताना कविकुलगुरूच्या प्रतिभेचा केवळ कळस झालेला आहे. **"मार्गाचलव्यतिकराकुलितेव सिन्धुः**












**शैलाधिराजतनया न ययौ न तस्थौ !** " मदनाची पत्नी रति, हरकोपाने तो दग्ध झाल्यानंतर सती जाण्यास निघते, कारण, शशीबरोबर कौमुदी जाते, मेघाबरोबर वीज नष्ट होते, प्रमदा पतिगामिनी असतात हे अचेतनांनीसुद्धा सिद्ध केलेले आहे, मग सचेतनांची काय कथा ! " **प्रमदाः पतिवर्त्मगा इति प्रतिपन्नं हि विचेतनैरपि !** " ज्याच्या नावाचा 'शृंगारिक शृंगारिक' म्हणून गाजावाजा झालेला आहे, त्या कालिदासाचा शृंगार हा असा आहे. शुचितेने, त्यागाने, निष्ठेने आणि तपस्येने त्याला रत्नकांचनाचे सौंदर्य, गंगेचे पावित्र्य आणि अग्निशिखेची दीप्ति लाभलेली आहे. संयम आणि उपभोग यांचा समन्वय साधणारा हा भारतीय संस्कृतीचा प्रातिनिधिक शृंगार आहे.

पतिपत्नींच्या प्रीतीची सफलता आणि कृतार्थता अपत्य-वात्सल्यात आहे. दोहदव्यथा सहन करणाऱ्या सुदक्षिणेचे, सीतेचे आणि शकुंतलेचे वर्णन कालिदासाने कमालीच्या हळव्या आणि नाजुक सहृदयतेने केलेले आहे. गर्भवती सुदक्षिणा त्याला " **शमीमिवाभ्यन्तरलीनपावका** " अशी वाटते-तशीच शकुन्तला. अपत्य हे पतिपत्नीचे प्रेम दृढ करणारे बन्धन आहे, ती आनन्दग्रन्थि आहे असे भवभूतीप्रमाणे कालिदासालाही वाटते. चक्रवाकाप्रमाणे परस्परांवर असलेले पतिपत्नींचे प्रेम अपत्यामुळे वाटले गेले तरी वाढलेलेच राहते. " **रथाङ्गनाम्नोरिव भावबन्धनं बभूव यत्प्रेम परस्पराश्रयम् । विभक्तमप्येकसुतेन तत्तयोः परस्परस्योपरि पर्यचीयत ॥** " पुत्रजन्माच्या आणि पुत्रलीलांच्या आनंदाचे त्याने केलेले वर्णन अक्षरवाङ्मयात जमा झालेले आहे – " **आलक्ष्यदन्तमुकुलाननिमित्तहासैः अव्यक्तवर्णरमणीयवचःप्रवृत्तीन् । अङ्काश्रितः प्रणयिनस्तनयान्वहन्तो धन्यास्तदङ्गरजसा मलिनी भवन्ति !** "

## ( २ )

यावरून कालिदासाची जीवनाकडे पाहण्याची दृष्टि सहजच स्पष्ट होईल. तो अत्यंत प्रवृत्तिवादी कवि आहे. जीवन त्याला आनंदमय वाटते. जीवितातील दुःखांची उपेक्षा करण्याइतका तो एकांगी आणि उथळ नाही. त्यात वियोगाचे दुःख आहे, मृत्यूचे दुःख आहे, पण तितकेच त्यात सुखही आहे; किंबहुना संसारातील दुःखानीच उन्हामुळे सावलीला तशी सुखाला चव चढत असते. " **यदेवोपनतं दुःखात्सुखं तद्रसवत्तरम् । निर्वाणाय तरुच्छाया तप्तस्य हि विशेषतः ॥** " जीवनाची क्षणभंगुरता त्याला मान्य आहे, पण ती जितकी खरी आहे, तितकाच जीवनानंदही त्याला खरा वाटतो. क्षणभर जरी जगायला मिळाले तरी तो माणूस भाग्यवान् होय. परंतु हे जीवन हेच एकुलते एक जीवन नव्हे; तो अनंत भूतकाळ आणि अपार भविष्यकाळ यांच्या महानद्यांवर उभारलेला सेतु आहे. पुनर्जन्मावर त्याचा विश्वास आहे, आणि पूर्वजन्मींच्या ऋणानुबंधांनी हृदयात खळबळ माजते असे त्याला वाटते " **तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि !** " व्हिक्टर ह्यूगोप्रमाणे कालिदासाचेही मत आहे की *This life has morrow.* "

ईश्वरावर त्याची निःसीम श्रद्धा आहे. आणि हिंदूंच्या स्वभावधर्माप्रमाणे तो सहिष्णु आहे. ब्रह्मा विष्णु महेश ही एकाच परमतत्त्वाची रूपे आहेत हे त्याला मान्य आहे. अनेक दिशांनी येणाऱ्या जाह्नवीचे जलौघ ज्याप्रमाणे समुद्रात मिळतात, त्याप्रमाणे विविध मार्गांनी परमेश्वरप्राप्तीची सिद्धि प्राप्त होते. " **बहुधाप्यागमैर्भिन्नाः पन्थानः सिद्धिहेतवः । त्वय्येव निपतन्त्योघाः जाह्नवीया इवार्णवे ॥** " रघुवंशातील विष्णु, कुमारातील ब्रह्मा, राम यांची वर्णने त्याने सारख्याच भक्तिभावाने केलेली आहेत. पक्षपात असलाच तर तो शिवाबद्दल आहे. त्या विरक्त तरीही अनुरक्त नटराजाने कालिदासाच्या समर्थ प्रतिभेला इतकी मोहिनी घातली की त्याच्या लीलांचे वर्णन करण्यास त्याने कुमार–संभवाची सौंदर्यगाथा गायिली. तात्पर्य इतकेच की जीवनाबद्दल कालिदासाला उबग नाही, संशय नाही, संभ्रम नाही, – आहे ती प्रसन्नता आणि शांतता !

कालिदासाची संस्कृति ही निर्भेळ हिंदु संस्कृति आहे. त्याच्या काळी इस्लामचा उदय झालेला नव्हता आणि बौद्धांच्या निराशावादाची छाया त्याच्या वाङ्मयावर पडलेली नव्हती. गंगा, यमुना, शरयू, सरस्वती या भारताच्या लोकमातांबद्दल त्याच्या अन्तःकरणात सीमेची भक्ति आहे. रामचन्द्राला शरयू नदी ही माता कौसल्येप्रमाणे वाटते, कारण तिच्याप्रमाणेच







राजा दशरथापासून ती विमुक्त झालेली आहे आणि तिच्याप्रमाणेच तरंगहस्तांनी ती त्याला आलिंगन देत आहे: रामाचीच नव्हे, ती उत्तरकोशलांचीच सामान्य-धात्री, लोकमाता आहे–'**त्या सैकतोत्सङ्गसुखोचितानां प्राज्यैः पयोभिः परिवर्धितानाम् । सामान्य धात्रीमिव मानसं मे संभावयत्युत्तरकोशलानाम् ॥** ' गंगा–यमुनांचा संगम हा सौंदर्याचा रमणीय रंगपटच आहे. निळी यमुना आणि गोरी गंगा या निळी कमळे आणि पांढरी कमळे, शुभ्र चन्द्रिका आणि काळ्या छाया याप्रमाणे रम्य आहेत, नव्हे, ती काळ्या सर्पांची भूषणे ल्यायलेली आणि भस्मांचा अङ्गराग धारण करणारी ईश्वराची विभूतीच आहे ! त्यांच्या अलौकिक सौंदर्याने मोहित झालेल्या कालिदासाच्या आत्म्याची भक्तीत भावसमाधि लागते आणि तो सहजच उद्गारतो, की या समुद्रपत्नींच्या जलसंगमात स्नान केलेल्या पुण्यश्लोकांना ज्ञानाविनाहि पुनर्जन्मापासून मुक्ति लाभते– ! " **समुद्रपत्न्योर्जलसंनिपाते पूतात्मनामत्र किलाभिषेकात् । तत्त्वावबोधेन विनापि भूयस्तनुत्यजां नास्ति शरीरबन्धः !** " ज्याप्रमाणे गङ्गायमुना या ईश्वरस्वरूपिणी आहेत, त्याप्रमाणेच हिमालय हा देवतात्मा आहे. त्याच्या अविच्छिन्न, अमल, समुद्रापर्यंत पोंचलेल्या कीर्ति आणि सरिता पुण्यशीलतेने जगाच्या पापाचे क्षालन करितात. तसेच छाया आणि फळे देणारे वृक्ष–त्याचे ऋषि, त्याची पार्वती, त्याची शकुंतला, त्याचा अज हे सर्व वृक्षांवर माणसाप्रमाणे प्रेम करणारे आहेत. शरभंग ऋषीच्या अवसानानंतर त्याची अतिथिसेवा छायेने पथिकांचा श्रम हरण करणाऱ्या, आणि विपुल फलांनी संभावना करणाऱ्या **त्याच्या सुपुत्रांप्रमाणे** असलेल्या वृक्षात अवशेष राहिलेली आहे. त्याची पार्वती स्कन्दाप्रमाणे देवदारु वृक्षाला वाढवते, वन्य पशूंनी ओरबाडलेल्या त्या वृक्षाला पाहून असुरांच्या शस्त्रांनी जखमी झालेल्या स्कन्दाला पाहिल्याप्रमाणे तिला वेदना झाल्या, स्कन्दाप्रमाणेच तोही " **यो हेमकुम्भस्तननिसृतानां स्कन्दस्य मातुः पयसां रसज्ञः** " आहे, कारण तो तिने " पुत्रीकृत " केलेला आहे. त्याची शकुंतला वनज्योत्स्ना अनुरूप वृक्षाशी संगत झालेली आहे याचे समाधान मानते. जसे वृक्ष, तसे मृग. शकुंतलेने श्यामाकाच्या घासांनी वाढवलेला तिचा मृग तिच्या पायात पुन्हा पुन्हा घोटाळत आहे– " **श्यामाकमुष्टिपरिवर्धितको जहाति सोऽयं न पुत्रकृतकः पदवी मृगस्ते ।** " वसिष्ठाची नंदिनी धेनु– पल्लवांप्रमाणे स्निग्ध आणि तांबूस असलेली– आपल्या खुरांनी उडालेल्या गोरजांनी तीर्थाभिषेकाची शुद्धि राजास अर्पण करीत आहे. फुललेली हिरवीगार शेते, जांभळीने काळी झालेली बने, झाडांवर घरटे बांधणारे कावळे, वेगाने धावणारे घोडे, शैवलमंजरीची जाळी ओढणारे पर्वतासारखे हत्ती, आकाशात धावणारे गोदावरीच्या सारसपक्ष्यांचे थवे, मदोन्मत्त बैलाप्रमाणे उभा असलेला चित्रकूट हे सर्व त्याला मोह घालतात. ईश्वराप्रमाणे त्याचा समुद्र अवर्णनीय आणि अनंत आहे. तो सरितांचा अनन्यसामान्य पति आहे– "**अनन्यसामान्यकलत्रवृत्तिः पिबत्यसौ पाययते च सिन्धुः !** " आकाशाचे चिरंतन प्रवासी असलेले मेघ तर त्याला इतके प्रिय आहेत की दूरदेशी असलेल्या आपल्या प्रियेला प्रीतिसंदेश वाहून नेणाऱ्या दूताचे वैभव त्याने त्यांना अर्पण केले. तरंगांचे भ्रूभंग असलेली, क्षुब्ध पक्ष्यांची मेखला ल्यायलेली, संरम्भशिथिल वस्त्राप्रमाणे फेस ओढून नेणारी नदी ही त्याला संतप्त उर्वशीप्रमाणे वाटते. त्याचा निसर्ग हा निर्जीव नाही. नदी म्हणजे त्याला पाण्याचा सांठा वाटत नाही, मेघ म्हणजे धूर, ज्योति, सलिल, वारा यांचा संघात वाटत नाही, पर्वत म्हणजे दगड आणि माती यांचा गोळा वाटत नाही. निसर्गावर चेतनेचा आरोप हे तर कालिदासाच्या प्रतिभेचे मनोज्ञ वैशिष्ट्य आहे, नव्हे त्याच्या लेखी तो आरोप नसून ते एक रम्य सत्यच आहे. त्याचा निसर्ग हा चेतनेने, जीवनाने थबथबलेला, रसरसलेला, थरथरणारा आहे. सृष्टीतील एक सौंदर्य असे नाही की जे त्याच्या सर्वंकष सौंदर्यदृष्टींतून निसटलेले आहे. याबाबतीत तो कीट्स् प्रमाणेच " Beauty is Truth and Truth Beauty " असे म्हणणारा आहे. याबाबतीत तो मोराप्रमाणे आणि ईश्वराप्रमाणे अक्षरशः अनंतचक्षु आहे. जशा नद्या, तशीच नगरे– अयोध्या, विदिशा, माहिष्मती, मथुरा, उज्जयिनी तर त्याची इतकी लाडकी की मेघालाही जो आग्रह करतो की वाट थोडी वाकडी झाली तरी हरकत नाही, परंतु त्याच्या विजेच्या सोनेरी दीप्तीने चकित झालेल्या उज्जयिनीच्या ललनांचा विलोल नेत्रविलास त्याने






पाहिला नाही तर फुकट त्याचे जिणे ! " **वक्रः पन्था यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां सौधोत्सङ्गप्रणयविमुखो मा स्म भूरुज्जयिन्याः !** "

(३)

कालिदास हा राजसत्तेचा पुरस्कर्ता आहे; कारण त्याच्या काळी लोकसत्ता नव्हती आणि तो राजाचा आश्रित होता. " **महती देवता ह्येषा नररूपेण तिष्ठति ॥** अशीच राजांबद्दल भारतीयांची परंपरागत श्रद्धा आहे, ती कालिदासाचीही आहे. अग्निमित्राला पाहून " **महत् खलु पुरुषाकारमिदं ज्योतिः** " असे त्याचा गणदास म्हणतो. हरदत्ताला तो समुद्राप्रमाणे प्रत्येक क्षणी नवा वाटतो. राजा आणि राजपुत्र हे सारखेच तेजस्वी- दिव्याने दिवा लावावा तसे. " **प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्** । " त्यांच्यात विभागलेली राजलक्ष्मी हिमाद्रि आणि सिन्धु यांच्यात विभागलेल्या गंगेप्रमाणे शोभते. थोडक्यात राजा आणि राजकुल ही ईश्वरस्वरूप आहेत. पण कालिदासाची ही राजभक्ति अंधभक्ती नव्हे. राजा या शब्दाची त्याची उपपत्तीच मुळी 'प्रजेचे रंजन करतो तो राजा ' ' **राजा प्रकृतिरञ्जनात्** ' अशी आहे. क्षत्रियधर्माचे मूर्तिमंत रूप असलेले हे राजे दीनांचे परित्राण हाच आपला परमधर्म समजतात; मग तो दीन माणूस असो, की याचक असो की गाय असो; कारण क्षतापासून वाचवणारा तो क्षत्रिय अशी त्यांची धारणा आहे. '**क्षतात्किल त्रायत इत्युदग्रः क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः !** " प्रजांच्या शिक्षणाची, रक्षणाची, पोषणाची चिंता वाहणारे हे राजे त्यांचे खरे पिते होत; इतर फक्त जन्मदाते. " **प्रजानां विनयाधानाद्रक्षणाद्भरणादपि । स पिता पितरस्तासां केवलं जन्महेतवः ।** " प्रजांचे ते आदर्श आहेत. वेळेवर उठणारे, वेळेवर झोपणारे, अपराधाप्रमाणे शिक्षा करणारे, – शैशवांत अभ्यास, यौवनात संसार, वार्धक्यात निवृत्ति पत्करणाऱ्या या राजांच्या जीवनात एक प्रकारचे कलावंतांचे क्रम–सौंदर्य आहे. राजनीतीचे ते धुरंधर आहेत. केवळ नीति हे कातर्य, आणि केवळ शौर्य हे पशुचेष्टित, म्हणून नीति आणि शौर्य, युक्ति आणि शक्ति यांच्या मिश्रणाने ते सिद्धि मिळवितात–

**"कातर्यं केवला नीतिः शौर्यं श्वापदचेष्टितम् ।**
**अतः सिद्धिं समेताभ्यामुभाभ्यामन्वियेष सः ॥ "**

राजनीतीचा हा सिद्धांत सनातनच आहे, तो समर्थांनी सांगितला आहे कीं " **शक्तीने मिळती राज्यें युक्तीने राज्य होतसे । शक्तियुक्ति जये ठायी तेथे श्रीमंत धावती ॥** "

राजा हा प्रजेचा उपभोगशून्य स्वामी आहे, राज्य उपभोग म्हणजे राज-संन्यास होय. राजाला सुख नाही. " *Uneary lies the head that wears the crown.* " स्वतःच्या सुखाच्या बाबतीत निरभिलाष राहून तो लोकांसाठी कष्टत असतो, म्हणूनच तो ' राजर्षि ' आहे. त्यांची राजनीति ही मध्यमक्रमावर आधारलेली आहे. कठोरता आणि मृदुता यांचा सुंदर समन्वय साधणारी आहे. ' **न खरो न च भूयसा मृदुः पवमानः पृथिवीरुहानिव । स पुरस्कृतमध्यमक्रमो नमयामास नृपाननुद्धरन् ॥** " " जग जिंकून अश्वमेध करणे ही त्यांची महत्वाकांक्षा. पण जग जिंकण्याची ही वासना सात्त्विक आहे. त्यांचा दिग्विजय हा पाशवी नाही, संस्कृति आणि राष्ट्रे खाणारा नाही, कारण ते धर्मविजयी राजे आहेत. " **गृहीत प्रतिमुक्तस्य स धर्मविजयी नृपः । श्रियं महेन्द्रनाथस्य जहार न तु मेदिनीम् ।** " उदात्त आदर्शासाठी, प्रजापालनासाठी, प्रजेपुढे उज्ज्वल आदर्श ठेवण्यासाठी सर्वस्व पणाला लावणारे ते पुण्यश्लोक राजे आहेत. त्याचा दिलीप गायीला वाचवण्यासाठी सिंहास स्वतःचे शरीर अर्पण करतो. कारण, " **एकान्तविध्वंसिषु मद्विधान्तं पिण्डेष्वनास्था खलु भौतिकेषु** " त्याच्या रामचंद्राने परमप्रिय अशा प्रत्यक्ष पत्नीचा त्याग केला कारण '**अपि स्वदेहात् किमुतेन्द्रियार्थाद्यशोधनानां हि यशो गरीयः !**' व्यक्तिधर्मापेक्षा राजधर्म येथे श्रेष्ठ आहे. त्याना धनाची अभिलाषा नाही. जग जिंकून आणलेले सर्व द्रव्य ते याचकांना दान करितात; कारण मेघांप्रमाणे सज्जनांचेही आदान हे विसर्गासाठीच असते. सत्तेची अभिलाषा तर त्यांच्या रक्तातच नाही. आजन्म अनासक्तीने आणि धर्मबुद्धीने राज्यपालन केल्यानंतर उत्तरायुष्यात या सम्राटांचा आश्रय म्हणजे वृक्षाची छाया आणि आहार म्हणजे कंदमुळे ! कारण ते त्यांचे कुलव्रतच आहे. " **गलितवयसामिक्ष्वाकूणामिदं हि कुलव्रतम् ।** " कालिदासासारख्या सिद्धहस्त महाकवीनेही आपली शब्दसंपदा ज्याच्यावर मुक्तहस्ताने उधळावी असे










अनुक्रमणिका

हे रघुकुलाचे दीपक आहेत. रघुवंश ही अशा प्रकारे उदात्त आणि गंभीर, कठोर आणि करुण, जयिष्णु आणि वर्धिष्णु, आदर्श आणि वास्तव भारतीय राजधर्माची तेजस्वी विजयगाथा आहे.

(४)

"**परस्परविरोधिन्योरेकसंश्रयदुर्लभम् । संगतं श्रीसरस्वत्योर्भूतयेऽस्तु सदा सताम् ॥**" अशी प्रार्थना **विक्रमोर्वशीयाचे** अखेरीस कालिदासाने केलेली आहे. कालिदास कवि होता आणि म्हणून त्याने केलेली ही प्रार्थना सार्थ आणि साभिप्राय आहे. कारण कवि आणि ऐश्वर्य यांचा सामान्यतः छत्तीसाचा आकडा असतो. प्रतिभेच्या बाबतीत कुबेर आणि कांचनाच्या बाबतीत कंगाल असाच शंभरात नव्याण्णव कवींचा ललाटलेख असतो. कालिदासालाही हे माहीत आहे "**निसर्गभिन्नास्पदमेकसंस्थमस्मिन्द्वयं श्रीश्च सरस्वती च**" असे उद्गार त्याने काढलेले आहेत. दारिद्र्याचे हे दुर्दैव इतके घोर आहे की, दिक्कालात भरारी मारणाऱ्या कवीच्या प्रतिभेचे गरुडपंख त्याने कापले जातात आणि त्याचा आत्मा विषण्ण आणि कडवट होतो. वाङ्मयाचा इतिहास सांगतो, की प्रतिभा आणि दारिद्र्य यांचा नित्यसंबंध इतका काही विलक्षण आहे, की **देवदत्तः दरिद्रः विद्वत्त्वात् । यत्र यत्र विद्वत्त्वम् तत्र तत्र दरिद्रत्वम् ।**" हा तर्कशास्त्रात हेत्वाभास ठरेल कदाचित् पण व्यवहारात तो निर्दोषच तर्क आहे या बाबतीत "East is East and West is West, And the two never shall meet" असा पंक्तिप्रपंच नाही. पूर्वपश्चिमेचा संगम इतर कोठे नसला तर येथे झालेला आहे. गोल्डस्मिथ दरिद्री होता, फील्टिंग तुरुंगात गेला. मिल्टन दरिद्री आणि आंधळा होता, त्याच्या महाकाव्याबद्दल त्याला फक्त पाच पौंड मिळाले. जॉनसनला आजचा दिवस गेला. उद्याचा कसा जाईल याची भ्रांत होती. अंतकाळापेक्षा मध्याह्नकाळ कठीण असतो, हे सत्य त्याला इतके काही समजले होते की, "Slow rises worth by Poverty depressed" असे उद्गार त्याने काढले, आणि केवळ लिहून समाधान झाले नाही म्हणून मुद्दा निर्बुद्धांच्या मनावर ठसविण्यासाठी त्याने या ओळीतले प्रत्येक अक्षर ढळढळीतपणे Capital लिपीत काढून ठेविले! कविराज चंद्रशेखरांचा सगळा जन्म मेडिकल खात्यात कारकुनी करण्यात गेला. भर्तृहरीने '**अर्थोऽस्तु नः केवलम्**' असे रडगाणे गायिले. केशवसुत जन्मभर शाळा-मास्तर होते. असे दारुण दुर्दैव कालिदासाच्या वाट्यास आले नाही हे त्याचे व आपलेही भाग्यच होय. तो राजाश्रित कवि होता मग भोजाचा असो वा विक्रमादित्याचा असो. '**विनाश्रया न शोभन्ते पण्डिता वनिता लता**" या न्यायाने वृक्षाने लतेला, पतीने वनितेला जी शोभा आणि स्वस्थता येते, ती राजाश्रयाने कालिदासाला आलेली आहे. त्याच्या समग्र वाङ्मयावरती समाधानाची जी गार आणि सुगंधित छाया पसरलेली आहे, काठोकाठ भरलेल्या तृप्तीचे जे शीतल, स्निग्ध आणि शांत पहाटेचे चांदणे पडलेले आहे, त्याचे हे मूळ आहे. त्याचप्रमाणे जनतेकडून त्याची उपेक्षा झालेली नाही. फार लौकर आणि फार सहज त्याला परोक्ष आणि अपरोक्ष कीर्तीचा आणि लोकप्रियतेचा लाभ झाला. "**अद्यापि तत्तुल्यकवेरभावादनामिका सार्थवती बभूव**।' असे त्याच्याबद्दल उद्गार निघाले. '**साकूतमधुरकोमलविलासिनीकूजितप्राये । शिक्षासमयेऽपि मुदे रतलीलाकालिदासोक्तिः ॥**" असे गोवर्धनाचार्याने म्हटले आहे '**निर्गतासु न वा कस्य कालिदासस्य सूक्तिषु । प्रीतिर्मधुरसार्द्रासु मंजरीष्विव जायते ॥**' असे बाणाने म्हटले. "**उपमा कालिदासस्य**" असा तो उपमेचा मानदंड होऊन बसला. "**एकोऽपि जीयते हन्त कालिदासो न केनचित् । शृंगारे ललितोद्गारे कालिदासत्रयी किमु ॥**" अशी त्याच्या अजिंक्य प्रतिभेची स्तुति गायिली गेली. तो '**कविकुलगुरु**' झाला, संस्कृत कविताकामिनीचा तो 'विलास' झाला. कवि हे सामान्यतः परस्पर प्रतिस्पर्धी असतात, हा "बोद्धारो मत्सरग्रस्ताः" हा न्याय लक्षात आणला म्हणजे कालिदासाचे हे भाग्य असामान्यच म्हणावे लागेल. माणूस माणसाला या गोष्टी देऊ शकत नाही. त्या अतर्क्य आहेत, "**देणे ईश्वराचे**" अशा कोटीतल्या आहेत. त्याचमुळे या गोड आणि '**मधुरालापनिसर्गपण्डिता**' अशा प्रतिभेच्या परमेश्वराला भवभूतीप्रमाणे उग्र, उदात्त तरीही कडवट दर्पाने भरलेले उद्गार काढावे लागले नाहीत की, "**उत्पत्स्यतेऽस्ति**

मम कोऽपि समानधर्मा कालोऽह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ! "

पण मुळात प्रतिभा जरी असली, तरी त्याला अभ्यास आणि अवलोकन यांची जोड असावी लागते. "**नैसर्गिकी च प्रतिभा श्रुतं च बहुनिर्मलम् । अमन्दश्चाभियोगश्च ।** ." या दृष्टीने पाहिले तर कालिदासाने आपल्या प्रतिभेच्या 'सहज' गुणाला प्रवास आणि पांडित्य ' या आगंतुक ' गुणांची फारच मोठी जोड दिलेली दिसून येईल. तो केवळ कवि नाही तर तो पंडित कवि आहे; विशेष इतकाच की पांडित्याचे त्याने प्रदर्शन केलेले नाही; त्याचे त्याला ओझे झालेले नाही, पांडित्याच्या अलंकारांनी त्याच्या प्रतिभेला धाप लागलेली नाही; फुलातून सुगंध तसे त्याच्या काव्यातून पांडित्य लीलेने दरवळलेले आहे. "Learning sits lightly on his head." अशी त्याची स्थिति आहे. योगशास्त्राचे त्याला सखोल ज्ञान आहे. शिव हा योगीश्वर आहे. त्याचे वर्णन त्याने "**अवृष्टिसंरम्भमिवाम्बुवाहमपामिवाधारमनुत्तरङ्गम् । अन्तश्चराणां मरुतां निरोधान्निवातनिष्कम्पमिव प्रदीपम् ॥**" असे केलेले आहे. वृक्ष सुद्धा योगारूढ झालेले आहेत. "निवातनिष्कम्पतया विभान्ति । योगाधिरूढा इव शाखिनोऽपि !" सांख्यशास्त्राचे त्याला उत्तम ज्ञान आहे. नृत्य, संगीत, नाट्य यांचा तो रसिक अभिज्ञ आहे. राजनीतीचा त्याला परिचय आहे. ज्योतिःशास्त्र, सर्पविद्या, फलज्योतिष त्याला माहीत आहे. रामायण, महाभारत, पुराणे त्याने पचविलेली आहेत. मायावाद, स्वप्नवाद ही तत्त्वज्ञाने त्याला माहीत आहेत. "**स्वप्नो नु माया नु मतिभ्रमो नु ।**" त्याच्या काळचे एक ज्ञान असे नाही की जे त्याने हस्तगत केलेले नाही. याबाबतीत तो जवळ जवळ "**सर्वज्ञः स हि माधवः**" अशा कोटीतला आहे. या अभ्यासाने त्याच्या मूळच्या हिऱ्यासारख्या निर्मल प्रतिभेला तेजस्वी पैलू पडलेले आहेत.

या बाबतीत तो शेक्सपीअरपेक्षा निश्चित श्रेष्ठ आहे. शेक्सपियर हा निसर्ग-पंडित आहे. पण तो केवळ तितकाच आहे. कालिदासाप्रमाणे तो ग्रंथ आणि निसर्ग असा उभय-पंडित नाही. ड्रायडनने त्याचा बचाव केला आहे की, "Those who can him unlearned, give him the greater commendation; he was naturally learned." कवीने कवीची केलेली ही प्रशस्ति चातुर्याची व रसिकतेची आहे, पण त्याने काही शेक्सपियरचा विद्येचा अभाव लपत नाही. त्याचा विशेष हाच की मूळचा त्याचा प्रतिभेचा नैसर्गिक अंकुरच इतका जबरदस्त होता की भोवतालच्या वातावरणाचे प्रतिकूल खडक फोडून तो बाहेर आला. कालिदासाची आणि शेक्सपीयरची तुलना करताना कालिदासाच्या बाबतीत ही जमेची बाजू अवश्य लक्षात घेतली पाहिजे.

'**उपमा कालिदासस्य**' असे वचन आहे. उपमांचे सौंदर्य, समर्पकता, विविधता आणि विपुलता या दृष्टीने हे वचन सार्थ आहेच; उपमांची तेजस्वी रत्ने सहस्र हस्तांनी उधळणारा तो शब्दसृष्टीचा ईश्वर आहेच, पण त्याच्या पाण्डित्याच्या निदर्शक अशाही या उपमा आहेत. या उपमात "**आमयस्तु रतिरागसंभवो दक्षशाप इव चन्द्रमक्षिणोत्**" अशा पुराणकथातील उपमा आहेत. '**कमल इव विभाते कुन्दमन्तःस्तुषारं**' अशा निसर्गातल्या आहेत. '**सोऽभवद्वरवधूसमागमः प्रत्ययप्रकृतियोगसंनिभः**' अशा व्याकरणातील आहेत. **मारुतिः सागरं तीर्णः संसारमिव निर्ममः** अशा वेदान्तातील आहेत. '**उभौ विरोधक्रियया विभिन्नौ जायापती सानुशयाविवास्ताम्**' अशा संसारातल्या आहेत. निसर्गाचे व जीवनाचे त्याचे अवलोकन किती सूक्ष्म, आणि व्यापक असले पाहिजे, त्याचा उपमा हा मानदंड आहे.

उपमा हा सौंदर्याचा आविष्कार आहे, तर अर्थान्तरन्यास हा चिंतनाचा परिपाक आहे. जीवनाच्या अनुभवातून काढलेला निष्कर्ष त्याने अर्थान्तरन्यासाच्या रूपाने पुढे ठेविलेला आहे. '**निर्जितेषु तरसा तरस्विनां शत्रुषु प्रणतिरेव कीर्तये**,' '**स्वादुभिस्तु विषयैर्हृतस्ततो दुःखमिन्द्रियगणो निवार्यते**;' '**कामार्ता हि प्रकृतिकृपणाश्चेतनाचेतनेषु**;' '**नास्ति धीमतां कश्चिदविषयो नाम ।**' आकृतिविशेषेषु आदरः पदं करोति;' 'पत्तने विद्यमानेऽपि ग्रामे रत्नपरीक्षा ।'; '**क ईप्सितार्थस्थिरनिश्चयं मनः पयश्च निम्नाभिमुखं**

प्रतीपयेत्. ' अर्थान्तरन्यासाच्या बाबतीत कालिदासाची वाणी ही जीवनाच्या भाष्यकाराची गंभीर, प्रौढ आणि अर्थवती अधिकारवाणी आहे. भवभूतीप्रमाणेच तीही–' शब्दब्रह्मविदः कवेः परिणतप्रज्ञस्य वाणीमिमाम् !

त्याचप्रमाणे त्याचे कष्टही दारुण असले पाहिजेत. कालिदासाची कीर्ति अशी आहे की, त्याचा शब्द बदलावयाचा असेल तर श्लोक बदलावा लागेल. मोजक्या, वेचक, अर्थगर्भ आणि सौंदर्यसंपन्न शब्दांचे हे चिरेबंद आणि रेखीव शिल्प अपरंपार कष्टाविना साध्य नाही. त्याने आपणाला या बाबतीत अंधारातच ठेविलेले आहे. तो त्याचा विनय आहे. पण तर्काने व अनुमानाने ही गोष्ट समजण्यासारखी आहे. जरी ' *Art lies in concealing art* ' असे म्हटले आहे, तरी कलासाधना ही तप:साधनेप्रमाणेच उग्र, निर्दय आणि घोर आहे. कविता करताना चंद्रशेखरांनी रात्रीच्या रात्री जागून काढल्या. 'लोकांना हंसवण्यासाठी मला डोळयातून अश्रु काढावे लागतात ' असे श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे उद्गार आहेत. गिबनने आपल्या इतिहासाचे पहिले प्रकरण तीन वेळा लिहून काढले. विल ड्युरांटने 'Story of civilization ' या ग्रंथाचे प्रचंड हस्तलिखित तीन वेळा पुन्हा पुन्हा लिहून काढले. सिद्धहस्त लेखकाला सिद्धि मिळवण्याची साधनाही तशीच करावी लागते. ही साधना कालिदासाने केली असलीच पाहिजे. ही शब्दसिद्धि त्याला सहजसाध्य होती असे म्हणणे म्हणजे वाङ्मयाचे अज्ञान प्रकट करण्यासारखे आहे. कारण, प्रतिभेची व्याख्याच मुळी, " Genius is ten percent Inspiration and ninety percent perspiration " अशी केलेली आहे; आणि " Genius is capacity for taking infinite pains असे म्हटलेच आहे.

( ५ )

असे समजले जाते की हिंदु मन सामान्यतः निवृत्तिवादी आहे. या दृष्टीने पाहिले तर कालिदासाच्या वाङ्मयाचे आणि जीवनदृष्टीचे असामान्य वैशिष्ट्य हे आहे की प्रवृत्तिवाद त्यात ओतप्रोत भरलेला आहे. पण त्याचे जीवनावरचे प्रेम हे शहाणे, विवेकी आणि डोळस प्रेम आहे. ते वेडे प्रेम नाही. जीवनाबद्दल त्याला आसक्ति असली तरी तिच्या आहारी तो गेलेला नाही. '*Vanity of Vanities*' अशा तऱ्हेचा जीवन हा एक निरर्थक ' **आभास एव च** ' त्याला वाटत नाही. " *We are such staff as dreams are made of; And our little life is rounded with a sleep* " अशी उदात्त क्षणभंगुरता त्याला जीवनात दिसत नाही. उलटपक्षी, जीवन संपणार म्हणून त्याला दुःख होत नाही. हेच जीवन सत्य, पुढचे कोणी पाहिले आहे, म्हणून या जीवनातील प्रत्येक क्षणाचा अधाशाप्रमाणे उपभोग घ्यावा अशी त्याला घाई सुटलेली नाही. ' Unborn to-morrow, dead yesterday, why fret about them if today be sweet ? ' अशी उमरखय्यामाप्रमाणे त्याची कमलभक्षकाची वृत्ति नाही. श्रेय आणि प्रेय, अभ्युदय आणि निःश्रेयस्, भोग आणि त्याग यांचा रमणीय संगम त्याच्या जीवनदृष्टीत झालेला आहे. जीवनावर प्रेम करावे, पण त्याच्या आहारी जाऊ नये– " **नाभिनन्देत मरणं नाभिनन्देत जीवनम् ॥** " हा मध्यमक्रम त्याला संमत आहे. मिल्टनप्रमाणेच त्याला वाटते की, ' Nor love thy life, nor hate it; but what thou liv'st Live well; how long or short, permit to Heaven. " त्याच्या राजांच्या जीवनातही हाच मध्यमक्रम दिसून येतो. **जुगोपात्मानमत्रस्तो भेजे धर्ममनातुरः । अगृध्नुराददे सोऽर्थमसक्तः सुखमन्वभूत ॥** तात्पर्य, जीवनाबद्दलच्या निराशेचा नामगंधही त्याच्या साहित्यात दिसून येत नाही.

हा त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा तितकाच त्याच्या काळाचाही महिमा आहे. कारण कवि कितीही मोठा आणि सार्वकालिक असला, तरी अखेर त्याच्या काळाचा तो प्रतिनिधी असतो. त्याची प्रतिभा कितीही समर्थ व स्वयंभू असली, तरी त्याच्या काळाची व परिस्थितीची मुद्रा त्याच्या वाङ्मयावर उमटलेली असते. मध्ययुगीन मराठीतील संतवाङ्मयावरती विरक्तीची दाट आणि गंभीर छाया पडलेली आढळते; त्याची उपपत्ति अशी लावणे बहुधा चुकीचें होणार नाही. 'बरे झाले देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्ये' 'पोर मेले बरे झाले । देवे मायापाश तोडविले' असे तुकारामांनी म्हटले आहे. ' मूर्खांमाजी परममूर्ख ।








जो संसारी मानी सुख। या संसारदुःखाएवढे दुःख। दुसरे नाही ॥' असे समर्थांनी म्हटले आहे. 'संसार हा 'मुळीच नासका' आहे, तो पार करण्यास विठ्ठलाची भक्ति करावी 'टाळी वाजवावी। गुढी उभारावी। वाट हे चालावी। पंढीरीची ॥'. असा संतांचा उपदेश आहे. असा तर्क आहे की, बाराव्या शतकापासून भारतावर परचक्र आले, त्याने गांजलेले संत्रस्त लोक निवृत्तीकडे वळले असावेत. शिवछत्रपतींनंतर मराठी मनाची प्रवृत्ति परत पुरुषार्थी, ओजस्वी आणि जयिष्णु झाली, ती त्यांच्या पत्रांत, पोवाड्यात, बखरीत प्रतिबिंबित झालेली स्पष्टपणे दिसून येते. समर्थांचे **'आनंदवनभुवन'** हे कृतार्थतेने कांठोकाठ भरलेले काव्य आणि शिवाजीची '**वैराग्य उत्तरवयीं कराल तें थोडे; सांप्रत आम्हासही पराक्रमाचे तमासे दाखवावेत**' ही व्यंकोजीला उद्देशून लिहिलेली वाक्ये दुसरे काय दर्शवितात? व्यक्तीच्या भाषणात ज्याप्रमाणे तिचा आत्मा प्रतिबिंबित झालेला असतो, त्याप्रमाणे राष्ट्राच्या वाङ्मयात त्याचा आत्मा प्रतिबिंबित झालेला असतो. वाङ्मय हा राष्ट्रपुरुषाचा हुंकार आहे, ते त्याचे निःश्वसित आहे '**अस्य वा महतो भूतस्य निश्वसितमेतद् यदृग्वेदः!**' कालिदास हा विक्रमादित्याचा आश्रित होता. तो गुप्तांचा काळ भारताचे सुवर्णयुग होता की, ज्यावेळी ही भरतभूमि ऐश्वर्याच्या, विद्येच्या, समृद्धीच्या शिखरावर पोचली होती. अशा प्रसन्न आणि उज्ज्वल कालात निर्माण झालेले वाङ्मय जयिष्णु, प्रवृत्तिवादी आणि आशावादी असले, तर त्यात नवल कसले? '**जृम्भस्व सिंह, दन्तान् ते गणयिष्ये**' असे सिंहाच्या जबड्यात हात घालणारा कालिदासाचा भरत म्हणतो, ते उगीच नाही, व दामाजीला सोडवण्यासाठी राजांचा राजा जो मराठ्यांचा पंढरीनाथ तोही बादशहापुढे विठू महाराच्या रूपाने थैली घेऊन उभा राहतो, तेही उगीच नाही. जसे लोक तसे त्यांचे देव, जसे राष्ट्र तसे त्याचे वाङ्मय, हेच खरे. निराशेने, निवृत्तीने, पलायनवादाने संत्रस्त आणि पक्षघात झालेल्या राष्ट्रात मांजराचेही दात मोजणारी मुले निघणार नाहीत, मग सिंहाचे दांत मोजणारी मुले कोठून?

(६)

'**यत्पूर्वं विधिना ललाटलिखितं तन्मार्जितुं कः क्षमः!**' हे शब्द कालिदासाच्या बाबतीत फार चांगल्या अर्थाने खरे ठरले आहेत. त्याचा ललाट-लेख अत्यंत शुभ आणि उज्ज्वल असला पाहिजे. ईश्वराची कृपा, मनुष्याचे प्रयत्न आणि दैवाची अनुकूलता या तीन एकत्र न सापडणाऱ्या गुणांचा त्याच्या जीवनात प्रीतिसंगम झालेला आहे. प्रतिभा ही ईश्वरी कृपा, पांडित्य, कष्ट, अनुभव हा मानवी प्रयत्न आणि राजाश्रय व कीर्ति हे दैवदत्त वैभव या तीनही गोष्टींनी त्याच्या जीवनाला जी पूर्णता व भाग्यशालिता आली आहे त्याला खरोखरच तोड नाही. देवाने माणसाला यापेक्षा अधिक काय बरे द्यावे?

या सर्व गोष्टींची जाणीव त्याला असलीच पाहिजे. पण ती त्याने कोठेही दाखवलेली नाही. उलट, संयम आणि विनय हाच त्याचा विशेष आहे. तो म्हणतो, "**प्रायः प्रत्ययमाधत्ते स्वगुणेषूत्तमादरः।**" "**बलवदपि शिक्षितानामात्मन्यप्रत्ययं चेतः!**" या बाबतीत जगन्नाथाच्या तो अगदी उलट आहे. 'रसगंगाधरा'च्या प्रारंभी जगन्नाथाने आपलीच पाठ थोपटून घेतली आहे की, "**किं सेव्यते सुमनसां मनसापि गन्धः कस्तूरिकाजननशक्तिभृता मृगेण।**" उलट 'रघुवंशा'च्या प्रारंभी कालिदास म्हणतो की, '**क्व सूर्यप्रभवो वंशः क्व चाल्पविषया मतिः। तितीर्षुर्दुस्तरं मोहादुडुपेनास्मि सागरम्।**' भवभूतीप्रमाणे 'उदुम्बरनामानः जतूकर्णीपुत्रः।' अशी तो वंशावळ देत नाही. हा संयम आणि विनय केवळ लोकोत्तर आहे. माणसाला स्वतःच्या नावापेक्षा जगात काय प्रिय आहे? पण कालिदासाने नाइलाज म्हणून आपले नाव लिहिले इतकेच, तेही विनयाने. '**प्रथितयशसां भाससौमिल्लकादीनां प्रबन्धानतिक्रम्य वर्तमानकवेः कालिदासस्य क्रियायां कथं परिषदो बहुमानः।**' आपले काव्य नवीन आहे म्हणून भीतभीतच तो लोकांपुढे येतो; व म्हणतो की, '**सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः**' स्वतःच्या नावापलीकडे त्याने स्वतःबद्दल एक अक्षरसुद्धा लिहिलेले नाही! या संयमात आणि विनयात त्याची तुलना फक्त ज्ञानेश्वरांशीच होऊ शकेल. '**व्यासादिकांचे उन्मेख। राहाटती जेथ साशंक। तेथ मीही येक रंक। वाचाळी करी॥**' '**परी गीताईश्वर भोळा। ले व्यासोक्तिमाळा। परी माझीयां दूर्वांदळा। ना न म्हणेचि॥**' '**म्हणोनि माझे नित्य नवे। श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे।**








श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ ' अलौकिक प्रतिभा, अलौकिक ऐश्वर्य, अलौकिक लौकिक, अलौकिक विनय या उत्तरोत्तर चढत्या गुणश्रेणीमुळे कालिदासाचे जीवन हे ' सार ' अलंकाराचे उत्कृष्ट उदाहरण झालेले आहे– ' **उत्तरोत्तरमुत्कर्षः भवेत्सारः परावधिः !** '

(७)

कालिदासाबद्दल अनेक दंतकथा प्रचलित आहेत, पण त्या सर्वांत त्याचा मृत्यु ही हास्यास्पद दंतकथा आहे. ती ऐकून देवी सरस्वतीला हसूच कोसळेल. कारण, तिच्या या सुपुत्राला जन्म असला तरी मरण नाही. त्याचे मर्त्य शरीर भस्मसात् झाले असेल. तो जीवनाचा स्वभावच आहे. पण त्याच्या आत्म्याला मरण नाही. त्या मृण्मय शरीराच्या पणतींत पेटवलेली ती सौंदर्याची, शुचितेची व प्रतिभेची निर्मळ ज्योत हजार वर्षे उमलत होती व हजार वर्षे झाली तरी उमलतच राहील. कारण, अशाश्वतातून शाश्वताचा शोध घेणारा, आणि क्षणोक्षणी नष्ट होणाऱ्या मानवी जीवनात प्रकट झालेल्या चिरंतन भावनांची सौंदर्य-गाथा गाणारा महाकवि हा मृत्युंजयांच्या परंपरेतील मुकुटमणीच असतो. म्हणूनच " गीता हे जाणा वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभूची " असे ज्ञानेश्वरांनी म्हटले. म्हणूनच " आत्माराम दासबोध । माझे स्वरूप स्वतः सिद्ध । असता न करावा खेद । भक्तजनी ॥ ' असे रामदासांनी म्हटले, ईश्वराची गीता, ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी, दासांचा दासबोध, मिल्टनचे महाकाव्य, शेक्सपीयरची नाटके, याप्रमाणे कालिदासाचे सारस्वत अमर आहे; व त्याचे पृथ्वीवर अवशेष राहिलेले स्वरूप आहे की ज्याला वार्धक्य माहीत नाही की मरण माहीत नाही; कारण, त्यात त्याने त्याचा चिरंजीव व अमृत आत्मा ओतला आहे. ' *A good* book is a precious life–blood of a master–mind ' असे मिल्टनने म्हटले आहे. या संस्कृत कवींच्या अग्रणीबद्दल लिहावे तेवढे थोडेच आहे. मुक्या मनाने त्याच्यापुढे शब्दांचे बुडबुडे तरी किती उधळावेत ? मॅथ्यू, आर्नोल्डने इंग्लंडच्या कालिदासाबद्दल जे म्हटले, तेच या हिंदुस्थानच्या शेक्सपीयरबद्दल म्हणावे लागेल की—

" Others abide our question; thou art free, We ask and ask, thou smilest, and art still out–topping knowledge ! "










कु. पुष्पा वा. चौधरी

# "मनुप्रणीत राजनीती"

श्रुति, स्मृती व पुराण हे आर्यांचे प्रमाणग्रंथ होत. धर्म नीति, सदाचार, व्यवहार, राजनीती आणि कार्याकार्यादी कोणत्याही विषयासंबंधींच्या शंकानिरसनार्थ आपण उपरिनिर्दिष्ट ग्रंथत्रयाकडे भ्रमरकलापाप्रमाणे क्षेप घेतो. हे ग्रंथमणी अक्षय विचारांचे मानससरोवर आहे. भारतीय कल्पनेनुसार निखिल ज्ञानाचे अमूल्य भांडागार आहे. इतकेच नव्हे तर मानवाला अभ्युदय तद्वतच निःश्रेयसही प्राप्त करून देणारे आहेत.

" श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो
धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः"

—श्रुती म्हणजे वेद व स्मृती म्हणजे धर्मशास्त्र.

" श्रुतिस्मृतिविरोधे तु प्रमाणं परमं श्रुतिः.

याप्रमाणे श्रुती ग्रंथांचा महिमा निरतिशय असला तरी कालांतराने तो कमी होऊन सुलभ, प्रासादिक भाषेतील स्मृतिग्रंथ प्रमाण मानले जाऊ लागले, कारण व्यवहार व धर्म यांचा सुरेख संगम या ग्रंथाइतका अन्यत्र कोणत्याही ग्रंथांत दृग्गोचर होत नाही.

अनेक स्मृतिग्रंथांत मनुस्मृती ही प्राचीनत्वाच्या व उपयुक्ततेच्या दृष्टीने ज्येष्ठ व श्रेष्ठ मानिली आहे. श्रीमत् भगवद्गीतेनंतर रामगीता, पाण्डवगीता, देवीगीता, शिवगीता व गणेशगीता इत्यादी विपुल गीता निर्माण झाल्या तसेच महाभारताच्या मागून इतर असंख्य पुराणे तयार झाली. त्याचप्रमाणे मनुस्मृतीच्याही मागून प्रचुर स्मृती रचल्या गेल्या. तथापि भगवद्गीतेप्रमाणे व महाभारताप्रमाणे मनुस्मृतीचे देखील महत्त्व अद्यापी अबाधित आहे. कारण तिच्याद्वारे मनूने धर्माचे तद्वत् मोक्षाचे उपदेशामृत पाजिले आहे. आणि म्हणूनच अन्य स्मृतिकारांनी मनुस्मृतीची मुक्तकण्ठाने प्रशंसा केली आहे. " मनुर्वै यत्किंचित् अवदत् तत् भेषजम्. " एवं मनुस्मृतीचे अपूर्व असाधारणत्व सिद्ध आहे.

मनुस्मृतीचा सातवा अध्याय राजधर्म प्रतिपादनपर आहे. धर्मसूत्रांत राजनीती फारच त्रोटक आहे, राजमंडलाचे सिद्धान्त कमी आहेत. धर्मशास्त्राचा राजाच्या कर्तव्याविषयी दृष्टिकोन केवळ त्यांत आहे, परंतु राजनीतीची चर्चा मनुस्मृतीत प्रथम व त्यामानाने विस्तृत, प्रगत स्वरूपात आढळते. बौधायन, आपस्तंब वा गौतम यात ती अशी विस्तारपूर्वक आढळत नाही. मात्र कौटिलीय अर्थशास्त्रात व महाभारतात राजनीती सविस्तर आहे.

मनूने राजनीती विशद् करण्यापूर्वी राजप्रशंसा केली आहे. मनु म्हणतो,— राजा म्हणजे प्रजेच्या योगक्षेमार्थ सर्वप्रथम निर्माण केलेला ईश्वरी अंशच होय. अष्टदेवतांपासून राजाला अष्टविध कार्य करण्याची प्रेरणा मिळते. जसे– (१) इंद्रापासून पालन (२) वायूपासून जीवदान (३) यमापासून न्याय (४) सूर्यापासून प्रकाश अर्थात् शिक्षोन्नती (५) अग्नीपासून पवित्र वेदांना पृथक् करणे (६) वरुणापासून शांति स्थापन करणे (७) चंद्रापासून लोकाराधन म्हणजे प्रजा प्रसन्न करण्याचे व्रत धारण करणे आणि (८) कुबेरापासून कोशरक्षण करणे, नारद स्मृतींत मात्र राजाला पांचच देवतांचा अंश मानले आहे. मनूने सांगितलेल्या वायु, सूर्य व वरुण या देवतांचा अन्तर्भाव केला नाही.

मनूच्या मते सूर्यतेज ज्याप्रमाणे बघणाऱ्याच्या नेत्रांना संतप्त करते त्याप्रमाणे पृथ्वीवर कोणीही मनुष्य राजाच्या सन्मुख होऊन त्याला बघू शकत नाही. कारण त्याचे तेज सूर्याप्रमाणे दीप्तिमान व प्रखर असते. असाच राजा स्वतेजाने सर्व प्राणिमात्रांना वश करून आणि समयानुरूप आपल्या दैवी शक्तीचा प्रयोग करून प्रजाहित साधू शकतो.

राजा पृथ्वीतलावरील मानवरूपधारी देवता मानल्यामुळे मनूने सांगितले आहे की,— राजा अल्पवयी असला तरी प्रजेने त्याला तुच्छ समजू नये, त्याचा अवमान करू नये, अग्नीच्या सन्निध कुणी गेला तर तो फक्त त्याचेच भस्म करतो. परंतु क्रुद्धराजारूपीवन्हि धनपश्वादिसह समीपस्थाला भस्मसात करतो.



अनुक्रमणिका






राजाने प्रसंगानुरूप, देशकालानुसार यथाशक्ती तत्वविचार करून म्हणजेच सत्यासत्य जाणून, नानाविध देवतारूप धारण करून कार्यसिद्धि करावी.

राजा हा प्रत्यक्ष देवाचा अवतार आहे, हे तत्व भारतीय इतिहासात मात्र मान्य नव्हते. राजाची पदवी एक राजकीय हुद्दा आहे. राजा व प्रजा यांमधील संबंध " समयाने " कराराने बांधिला आहे. प्रजाजन राजास कर देतात व त्याचे शासन पाळतात याचे कारण तो प्रजेची नोकरी करतो हे होय. राजा " गोपाजनस्य " प्रजेचा रक्षणकर्ता, प्रजेचा नोकर, हे पुरातन कालापासून चालत आलेले महत्तम तत्व भारतीय नीतिशास्त्रात चिरस्थायी होऊन बसले आहे. " प्रजासुखे सुखं राज्ञः– " इ. हे तत्त्व राजाने निरंतर डोळयापुढे ठेवले पाहिजे, असे कौटिल्याने पुनःपुन्हा सांगितले आहे. त्यामुळे मनूची विचारधारा आपाततः विरोधी वाटणे स्वाभाविक आहे. तथापि मनूने राजाला जरी देवतास्वरूपी, सर्वाधिकारी ठरविले असले तरीसुद्धा त्याने विनयसंपन्न राहून, शास्त्रार्थापासून कदापी विचलित न होता प्रजानुरंजन करावे असाच उपदेश केला आहे.

राजाचा दंड देखील ईश्वरनिर्मित आहे. राजाने देश, काल, शक्ति, विद्या यांचा तत्वतः विचार करून अपराध्याला दंड करावा. दण्डाचे माहात्म्य अनन्यसाधारण आहे. सर्व लोक निद्रित असताही दंड जागृत असतो, व म्हणून स्तेयादी दुष्कृत्ये अल्प घडतात. त्यामुळे दंडालाच पंडित लोक " धर्म " म्हणतात. राज्यात यथायोग्य दंड केला जात असेल तर जनता सुखी समाधानी आनंदी राहते, अन्यथा मात्स्यन्याय अर्थात बळी तो कान पिळी अशी दुरवस्था निर्माण होऊन, असंतोष उत्पन्न होऊन ती नाश पावते " दुर्लभो हि शुचिर्नरः " अशी मनूची धारणा असल्यामुळे त्याने दण्डप्रशंसा प्रचुर केली आहे, व दंडाचे स्वरूपही भयानक व रोमांचकारी कल्पिले आहे.

" यत्र श्यामो लोहिताक्षो दंडश्चरति पापहा ।
प्रजास्तत्र न मुह्यन्ति नेता चेत्साधु पश्यति ॥ "

– असहाय, मूर्ख, लोभी, शास्त्रज्ञानहीन, विषयासक्त राजादींकडून यथोचित न्यायपूर्वक दंडप्रयोग होऊ शकत नाही, तर शुद्ध, सत्यप्रतिज्ञ, शास्त्रानुसार व्यवहार करणाऱ्या, उत्तम मित्र असणाऱ्या, बुद्धिमान् राजादींद्वारे योग्य दंडप्रयोग केला जाऊ शकतो. राजाने स्वराष्ट्रात यथान्याय दंडप्रयोग करावा, शत्रूदेशात कठोर दंडप्रयोग करावा, मित्रांशी सरळ व्यवहार करावा आणि ब्राह्मणांच्या बाबतीत मात्र क्षमावृत्ती स्वीकारावी. अशाप्रकारे न्यायी व शिलोंछ वृत्तीने जीवन व्यतीत करणाऱ्या राजाचे यश-तो ऐश्वर्यहीन असला तरी–जलातील तैलबिंदुप्रमाणे सर्वत्र प्रसृत होते. याउलट वागणाऱ्या स्वेच्छाचारी राजाचे यश वृत-बिंदुरिवाम्भसि " संकोच पावते.

राजाचे अमात्य कसे व किती असावे यासंबंधी आणि त्यांच्या नियुक्तिसंबंधी मनूने लिहिले आहे,

" अपि यत्सुकरं कर्म तदप्येकेन दुष्करम् ।
विशेषतो सहायेन किन्तु राज्यं महोदयम् ॥ "

– असाच अभिप्राय सर्वशास्त्रकारांचा आहे जसे–

" सहायसाध्यं राजत्वं चक्रमेकं न वर्तते ।
कुर्वीत सचिवांस्तस्मात्तेषां च श्रृणुयान्मतम् ॥ (कौ. अ. अधि. १ अ. ७) शुक्रनीतीत तर मंत्र्यांची आवश्यकता अधिक स्पष्ट शब्दात सांगितली आहे. तसेच मंत्रिमंडळाच्या कार्यपद्धतीविषयी सविस्तर वर्णन आहे. राजाने कुलवान् शास्त्रज्ञ, शूर, लब्धलक्ष एवंगुण विशिष्ट सात आठ किंवा कार्यानुरूप कमीअधिक मंत्र्यांची नियुक्ती करावी. त्यांच्यासह राजाने षड्गुणांची, स्थानांची, समुदयाची, गुप्तीची व लब्धप्रशमनाची चर्चा करावी असे मनूने सांगितले आहे.

(१) **षड्गुणः**– संधि-तह (२) विग्रह–युद्ध (३) यान–शत्रूवर चाल करून जाणे (४) आसन–शत्रूची उपेक्षा करणे (५) द्वैधीभाव–केव्हा संधि व केव्हा विग्रह करणे (६) संश्रय–मदतीकरिता दुसऱ्या राजाचा आश्रय करणे.

(२) **स्थानम् :**– १ दंड २ कोश ३ नगर व ४ राज्य ही स्थाने होय.

(३) **समुदयः**– सस्यसंपत्तीची व सोने, चांदी इ. संपत्तीची उगमस्थाने असलेल्या कृषि व खाणी यांच्या उत्कर्षाची, ऐश्वर्याची चिंता म्हणजे समुदयाचिंता.

(४) **गुप्तिः**– आत्मरक्षा व राष्ट्ररक्षा म्हणजे गुप्ती होय.



अनुक्रमणिका






(५) लब्धप्रशमनः– प्राप्ताचे रक्षण अथवा कुल्लुकांच्या मते सत्पात्री दान करणे म्हणजे लब्धप्रशमन होय. विद्वान्, गुणवान् मंत्र्यांबरोबर राजाने षाड्गुणांची चर्चा करावी व तदनंतर कार्यनिर्णय करावा. नित्य आढळणारा प्रभु, मंत्र व उत्साह या शक्तित्रयाचा उल्लेख मनुस्मृतीत आढळत नाही ही गोष्ट स्मृतिकोषात ठेवण्यासारखीच आहे. तसेच मनूने राजाला ईश्वरी अंश मानूनही त्याने मंत्रिमंडळाचा सल्ला घ्यावा असे म्हटले आहे. यावरून भारतीय राजाची सत्ता अनियंत्रित अशी केव्हाही नव्हती. राजाने ' धर्मार्थविरोधेन कामं सेवेत मर्यादाम् स्थापयेत्. " (कौ. अ. अधि १, अ. ७) राजाच्या हातून दिवसा किंवा रात्री दुर्विनीततेचा अतिरेक होऊन राजकर्तव्यात दुर्लक्ष व्हावयास लागले तर त्यास सावध करण्याकरिता अमात्याची व आचार्यांची योजना कौटिलीय अर्थशास्त्रात केलेली आहे. यांच्या नियंत्रणाशिवाय वृद्धसंयोग प्रकरणात सांगितल्यामुळे राजावर वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व अनुभववृद्ध अशा गृहस्थांचे नैतिक नियंत्रण होते. मंत्रिमंडळाचे नियंत्रण राजाच्या आचरणावर किती होते हे आपस्तंब सूत्रातील पुढील उक्तीवरून स्पष्ट होते- "भृत्यानामनुपरोधेन क्षेत्रं वित्तं च ददद्ब्राह्मणेभ्यो यथार्हमनन्तांलोकानभिजयति. " चंद्रगुप्त मौर्याचा नातू अशोक, याच्या कारकिर्दीत निदान एका प्रसंगी तरी राजाने स्वतः मान्य केलेला ठराव मंत्रिपरिषदेत चर्चेस्तव आला असता, बरीच भवति न भवति झाली, म्हणून त्यास या संबंधात " महामात्रांस " खलिता पाठवावा लागला, असा अशोकाचा शिलालेख ६ मध्ये स्पष्ट उल्लेख आहे : " And when in respect of anything that I personally order by word of mouth, for being issused or proclaimed or again, (if) in respect of any emergent work that may Superimpose itself on the Mahamatras, there is any division or rejection in the council, I have so commanded that it shall be forth with communicated to me at all places and at all hours." (D. R. Bhandarkar Ashok, P. 289.)

" सुदर्शन " तलावाच्या दुरुस्तीसाठी सरकारी तिजोरीतून रक्कम मंजुर व्हावी अशी स्वतः रुद्रदामन् राजाची मागणी असताना देखील, मंत्र्यांनी मंजुरी न दिल्यामुळे, राजाने आपल्या खाजगी शिलकेतून तलावाची दुरुस्ती केली इ. ऐतिहासिक उल्लेखावरून राजा सर्वस्वी निरंकुश नव्हता असेच म्हणावे लागेल. मात्स्यपुराणात अमात्यलक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे–

" समः शत्रौ च मित्रे च धर्मशास्त्रविशारदः
विप्रमुख्यः कुलीनश्च धर्मादिकरणो भवेत् "

–या ठिकाणी" "सम, शत्रौ च मित्रे च" या वचनाचा अर्थ गीतेतील अर्थाप्रमाणे नसून शत्रू व मित्र यांच्या बाबतीत युक्तीने वागणारा असा अभिप्रेत आहे.

परंतु मंत्री, अधिकारी जर लाचलुचपत करू लागले; प्रजेकडून अनुचित रूपाने धन घेऊ लागले तर राजाने त्यांचे सर्वस्व घेऊन त्यांना हद्दपार करून प्रजारक्षण करावे (७. १२३, २४) असे मनूने कडक शब्दात सांगितले आहे. प्रस्तुत कथनाशी सांप्रतची परिस्थिती विसंगतीपूर्ण विपर्यस्त वाटते. कारण हल्ली मंत्र्याने अशा स्वरूपाचा अनाचार केला तरी त्याला दंड वगैरे होत नाही. तोच राजीनामा देतो व मोठया सन्मानाने समाजात वावरतो.

दूतासंबंधी मनूने खालील विचार प्रकट केले आहेत. राजाने सर्वशास्त्रनिष्णात, इंगिताकारचेष्टज्ञ, शुची, दक्ष व कुलवान् दूतांना नियुक्त करावे. अनुरक्त, शुद्ध, चतुर, स्मरणशक्ती तीक्ष्ण असलेला देशकालज्ञ, सुरूप, निर्भय, आणि वाग्मी राजदूत श्रेष्ठ होय, हे पुढील स्पष्टीकरणाने ज्ञात होईलः–

(१) अनुरक्त– लोकप्रिय किंवा स्वामीनिष्ठ असे दोन अर्थ घेतले जातात. स्वामीनिष्ठ दूत असेल तर तो शत्रूला वश होणार नाही, तथापि लोकप्रिय अर्थ अधिक संयुक्तिक वाटतो, कारण तो लोकप्रियतेमुळे आत्यंतिक राजकल्याण साधू शकेल.

(२) शुद्धान्तःकरणाचा असला म्हणजे महापातकांना बळी पडणार नाही.

(३) चतुर असल्यामुळे धोरणाने वर्तन करील.

(४) तीक्ष्ण स्मरणशक्तीचा दूत संदेश विसरणार नाही.

(५) देशकालज्ञ असल्याने विचारपूर्वक कार्य करील.



अनुक्रमणिका

(६) वपुष्मान् असल्यामुळे त्याचे सर्वत्र वजन पडेल, दरारा राहील.

(७) निर्भयतेमुळे हितकारी पण अप्रिय बोलू शकेल.

(८) संभाषणचातुर्यामुळे राजाची बाजू सावरली जाईल. राजदूताच्या स्वाधीन संधि तसेच विग्रह असतो. दूतच शत्रूंना सम्मिलित करतो, मीलित मित्रांना दूर करतो (७.६५.६६) एवं दूताचे कार्य अत्यंत जबाबदारीचे असल्यामुळे मंत्र्यालाच ते काम करावे लागत असेल व म्हणून कदाचित कौ. अर्थशास्त्र दूताची गणना मंत्रिमंडळात करीत नसावे. मनु, शुक्र, रामायण वगैरे ग्रंथात दूत हा मंत्रिमंडळातील एक प्रमुख अधिकारी मानिला आहे. महाभारतात दूताचे महत्त्व-वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे–

" न तु हन्यान् महीपालो दूतं कस्याञ्चिदापदि ।
दूतहन्ता तु नरकमाविशेत्सचिवैः सह ॥ "

राजाचे अंतःपुर हे अनेक वाईट गोष्टीचे माहेरघर असते. त्यामुळे तेथील इतर गुप्तचरांच्या चेष्टांचा शोध लागावा म्हणून राजाने सर्वत्र दूतांचे जाळे विणावे, व त्यांच्याबरोबर अष्टविधकर्म पञ्चवर्ग, अनुराग, अपराग आणि राजमंडल यांच्या वास्तविक स्वरूपाचा विचार-विनिमय करून तदनुसार कार्यारंभ करावा.

**(१) अष्टविध कर्मे कोणती यासंबंधी मतभेद आहेत. मत- १**

१. आदान– प्रजेपासून करग्रहण.

२. विसर्ग– सेवकादींना वेतन-रूपाने द्रव्य देणे किंवा ब्राह्मणांना दान देणे.

३. प्रेषण– मंत्री किंवा दूतांना शास्त्रानुकूल कार्य-करण्याची आज्ञा देणे. जसे– त्यांना यथोचित स्थानी पाठविणे याऐवजी एका विद्वानाने " प्रैष " कर्म सांगून त्याचा अर्थ इहपरलोकी सुखदायक कर्म असा केला आहे.

४. निषेधः– शास्त्रविरुद्ध कर्म न करणे.

५. व्यवहारः– न्यायदान एका टीकाकाराने प्रजा कर्जबाजारी झाल्यास तिला मुक्त करण्याचा उपाय असे व्यवहारेक्षणाचे स्पष्टीकरण केले आहे.

६. दंडग्रहणः– अपराधानुरूप शासन करणे किंवा पराजित केलेल्या राजापासून शास्त्रोक्त पद्धतीने कर घेणे असेही एक मत आहे.

७. अर्थवचनः– संदिग्ध विषयामध्ये राजाने दिलेला निर्णय आप्त–वचन मानून त्याप्रमाणे वागणे.

८. शुद्धिः– पापक्षालनार्थ पुरोहितांकरवी प्रायश्चित्त घेणे.

आदाने च विसर्गे च तथा प्रैषनिषेधयोः ।
पञ्चमे चार्थवचने व्यवहारस्य चेक्षणे ॥
दंडशुद्ध्योः सदा युक्तस्तेनाष्टगतिको नृपः ॥
अष्टकर्मा दिवं याति राजा शक्राभिपूजितः ।
– (उशनस)

**(२) मेधातिथीच्या मते ही अष्टकर्मे पुढीलप्रमाणे होतः–**

१. आरंभ–न केलेल्या कार्याची सुरवात करणे.
२. आरंभित कार्य परिसमाप्त करणे. ३. परिसमाप्त कर्म वर्धित करणे. ४. कर्मफले संग्रहीत करणे. ५. साम ६. दाम ७. दंड ८. भेद.

(३) अष्टकर्मासंबंधी तिसरेही मत उपलब्ध आहेः—

(१) व्यापार मार्ग करणे (२) नदीवर म्हणजे पाण्यात पूल बांधविणे. (३) किल्ले बांधविणे. (४) केलेल्या संस्कारांचा निर्णय करणे. (५) हत्ती, घोडे इत्यादींचे बंधन घालणे. (६) खाणी खोदवून धातु उपधातु बाहेर काढविणे. (७) शून्यस्थानी प्रवेश करणे. (८) लाकडाची वने कापविणे.

**(२) पञ्चवर्गः**– पंचवर्ग म्हणजे पांच प्रकारचे हेर. हे सर्व हेर सोंग घेतलेले असून सर्व नगराची वार्ता राजाला कळवितात.

**पाच दूत येणेप्रमाणे–**

(१) कापटिक (२) उदास्थित (३) गृहपती (४) वैदेहिक (५) तापस. यांची कार्यः–

**(१) कापटिकः**– हा कपटविद्येत निपुण तसेच जीवितेच्छू असतो, राजा ह्याचा आदरसत्कार करून व धन देऊन "राज्यातील दुराचार मला शीघ्र कळव" असे एकांतात सांगतो. या कार्यार्थ हा लोकाशी कपटाने वागून त्यांची रहस्ये जाणून घेतो, सर्व दूतांना राजा हेच कार्य सांगतो.










( २ ) उदास्थित:– हा संन्यासकर्मापासून च्युत झालेला व त्यामुळे लोकनिंदित असतो. तथापि हा शुद्धान्तःकरणाचा, बुद्धिमान्, जीविताभिलाषी असतो. हा राजाचा आमरणान्तिक दास राहतो. राजा ह्यास मठाचा अधिपती करून ह्याच्या उपजीविकेची व्यवस्था करतो. हा संन्यासाचे सोंग स्वीकारून इतर जे संन्यासी असतील त्यांच्या हालचालींवर देखरेख ठेवतो व त्यांचा मनोदय राजाला सांगतो.

( ३ ) गृहपती:– बुद्धिमान्, निर्मल हृदयाचा असा हा शेतकऱ्याचा वेष घेऊन किंवा शेती करतो. याचीही उपजीविका राजा चालवतो.

( ४ ) वैदेहिक:– म्हणजे व्यापारी हासुद्धा वास्तविक व्यापारी नसतो, तर व्यापाऱ्याच्या मिषाने शत्रूंची गुप्त कृत्ये ओळखतो. राजा यासही धन देऊन व मानसन्मान करून याचे ठिकाणी आत्मीयता उत्पन्न करतो.

( ५ ) तापसव्यंजन :– म्हणजे लौकिक व्यवहारात आपण ज्याला बुवा किंवा ढोंगी साधू म्हणतो तो होय. हा जीविताभिलाषी असतो पण मुंडन करून जटा वाढवून तपस्व्याचा वेष घेतो. राजा आश्रम, मठ किंवा मंदिरावर ह्याला नियुक्त करतो. हा शिष्यपरंपरा ( अर्थात जनदृष्ट्या शिष्य परंतु वस्तुतः ह्याचे साथी राजदूत ) गोळा करून फिरतो, व लोकांना शिलोंच्छ वृत्तीने राहत असल्याचे भासवितो. याचे शिष्य 'गुरुदेव त्रिकालज्ञ आहेत, सर्वांना सिद्धि देणारे आहेत." असा ह्याचा महिमा गाऊन लोकात ह्याचेविषयी विश्वास उत्पन्न करितात. व प्रसिद्धि पसरवितात. त्यामुळे प्रजाजन आपल्या वांच्छित कार्याच्या सिद्धीसाठी याला मनोदय, अंतःस्थ गोष्टी व दुसऱ्यांची दुष्कृत्ये तसेच सत्कृत्ये सांगतात. अशा तऱ्हेने तो सर्व प्रकारची वार्ता राजाला देऊ शकतो. आणि म्हणून या पञ्चविध वेषांतरित हेरांबरोबर राजाने विचार-विनिमय करावा.

( ३ ) अनुराग तथा अपराग :– मंत्री, सेनापति, बंधु-बांधव राजकुमार, गुप्तचर आणि प्रजा इ. मध्ये आपल्याविषयी अनुराग आहे की अपराग ( स्नेहाचा अभाव ) आहे हे जाणून राजाने उपाययोजना करावी.

( ४ ) राजमंडल :– शत्रुराजांपैकी कोण आपल्याशी संधि करण्याची इच्छा करतो व युद्धाची तयारी करतो हे जाणून राजाने कार्य करावे.

अशाप्रकारे लोककल्याणाच्या दृष्टीने दूतांशी सल्ला मसलत करणे राजाला आवश्यक असते.

दुर्गाश्रयाचा उपदेश :– जांगल म्हणजे निसर्गसमृद्ध असलेल्या, तसेच धनधान्य संपन्न असलेल्या, धार्मिक लोक वैपुल्याने वसत असलेल्या, रोगराईचा उपसर्ग नसलेल्या, लतावृक्षांनी रमणीय बनलेल्या, विनीत लोकांनी युक्त असलेल्या व जेथे व्यापार आणि शेती इ. धंदे करून उपजीविका करणे सुलभ आहे अशा देशात राजाने वास्तव्य करावे. असा प्रदेश सर्वच राजांना लाभणे अशक्य असल्यामुळे केवळ उत्तम देश कोणता हे सांगण्याचाच प्रस्तुत कथनाचा हेतु असावा. याज्ञवल्क्यस्मृतीत या अर्थाचा श्लोक आहे–

" रम्यं पशव्यमाजीव्यं जाङ्गलं देशमावसेत ।
तत्र दुर्गाणि कुर्वीत जनकोशात्मगुप्तये ॥ "

मनूने पुढील सहा स्थाने दुर्गाकरिता योग्य म्हणून सांगितली आहेत :–

१. धन्वदुर्ग:– चारी बाजूला मरुभूमि म्हणजे वालुकामय प्रदेश असलेला.

२. महीदुर्ग :– निम्नोन्नत प्रदेश व तटांनी युक्त असलेला.

३. अब्दुर्ग :– अपरिमित जलाने चोहोंकडून वेष्टिलेल्या किल्ल्यास अब्दुर्ग किंवा जलदुर्ग अशी संज्ञा आहे.

४. वार्क्षदुर्ग:– चारी बाजूला चार कोसपर्यंत वृक्ष, काटेरी झुडपे लतापाश असलेला वार्क्षदुर्ग होय.

५. नृदुर्ग: – हस्तीअश्वरथपदाति या चतुरंग सैन्याने रक्षण केलेल्या किल्ल्यास नृदुर्ग किंवा मनुष्यदुर्ग असे नाव आहे.

६. गिरिदुर्ग:– पर्वताच्या शिखरावर असलेला, वर चढण्यास एकच कठीण व संकुचित मार्ग असणारा किंवा चहुकडून पहाड असलेला किल्ला गिरिदुर्ग ह्या संज्ञेस पात्र होतो.

या सर्वांत गिरिदुर्ग श्रेष्ठतम आहे. दुर्गाचा आश्रय केल्याने अल्प सैन्यानेही प्रजेचे रक्षण करणे सुकर जाते.

दवी पुराणात. म्हटले आहे :

" एवं हट्टे पुरे दुर्गे देया दृष्टिः शुभा नृप ।
शुभार्थे सौम्यरूपाणां उग्राणां परिवर्जयत् ।। "

**राष्ट्रसंग्रह :–** राजाने राज्य रक्षणासाठी सामादि उपायांची योजना करावी. सामदामभेद असफल होत असल्यास दंड अमलात आणावा. २, ३, ५ गावें मिळून एक रक्षागृह योजावे, १, १०, १००, १००० गावावर आवश्यकतेनुसार स्वामीस नियुक्त करावे. या अधिकाऱ्याने ग्रामनिरीक्षण करावे. असे राज्यरक्षण करणारा राजा उन्नतिसोपानावर आरूढ होतो. कात्यायनात राष्ट्रसंग्रहासंबंधी पुढील श्लोक आहे :

प्रजानां रक्षणं नित्यं कण्टकानां च शोधनम् ।
द्विजानां पूजनं चैव एतदर्थं कृतो नृपः ।। "

**करग्रहणः–** राजाने करग्रहण करून कोशसमृद्ध कसा करावा याविषयी मनूने खालील विचार मांडले आहेत : ज्याप्रमाणे जळु रक्ताचे व वत्स दुधाचे प्राशन करितात किंवा " यथा मधु समादत्ते रक्षन् पुष्पाणि षट्पदा: " तसे राजाने प्रजेला आर्थिक पीडा न देता, तिचे शोषण न करिता थोडा थोडा वार्षिक कर गोळा करावा. राजाने व्यापाऱ्यांकडून योग्य कर घ्यावा. त्याने पशु व सुवर्णाचा पांचवा भाग, धान्याचा सहावा हिस्सा, किंवा आठवा हिस्सा कर म्हणून ग्रहण करावा. वृक्ष, मांस, मध, तूप, सुगंधी द्रव्ये, औषधी, फल, मूल, फूल, भाजी, तृण, चामडे बांबू तसेच मातीची भांडी व दगडाच्या वस्तू इ. चा भाग करस्वरूपात ग्रहण करावा. सुतार, लोहार अथवा अन्य काबाड कष्ट करणाऱ्या मजुरांकडून–ते कर देण्यास असमर्थ असता–महिन्यातून एक दिवस काम करवून घ्यावें. तथापि राजा मरणासन्न असला तरी त्याने देवपाठी ब्राह्मणाकडून कर घेऊ नये. इतकेच नव्हे तर त्यास उपजीविका कष्ट न होता करिता येईल यासंबंधी काळजी घ्यावी. राजाने अति लोभाने वा दुष्टपणाने प्रजेकडून अन्यायपूर्वक कर घेऊ नये, असे कात्यायनांतही सांगितले आहे–

"अन्यायेन हि यो राष्ट्रात् करं दण्डं च पार्थिवः ।
सस्यभागं च शुल्कं चाऽप्याददीत स पापभाक्

तसेच करत्यागही करू नये याबद्दल महाभारतात पुढील श्लोक आहेत–

धर्मार्जितो महान् कोशो यस्य स्यात्पृथिवीपतेः ।
सोत्यल्पपरिवारोऽपि पृथिवीमधितिष्ठति ।।
अधनं दुर्बलं प्राहुर्धनेन बलवान् भवेत् ।
सर्वं बलवतः पथ्यं सर्वं तरति कोशवान ।।

जो राजा रक्षण करणार नाही त्याला कर घेण्याचा अधिकार नाही. तथापि कर हा रक्षणाची किंमत असा कौटिल्याचा अभिप्राय मनूला मान्य नाही. आणि एतद् विषयक मनूचीच विचारसरणी ग्राह्य व भूषणभूत वाटते. कौटिलीय अर्थशास्त्रात ( अधि ४ वैदेहिक रक्षण नाम अ. ) (२) व्यापाऱ्यांनी केलेल्या क्रय-विक्रयाला अनुसरून होणारे अर्थदंड वा आकारला जाणारा कर यासंबंधी सविस्तर व चिकित्सक विवेचन आढळते. या व्यापारविषयक सर्वंकष चिकित्सेत नानाविध भेसळ प्रकरणाचा कौटिल्याने विचार केला आहे.

सीमाविषयाचे बाबतीत मतभेद आढळल्यास राजाने गुप्त सीमाचिन्हे बनवावीत. तसेच 'दुर्भिक्षे धान्यं देशान्तरं न नेयम्' –अधिक लाभाच्या आशेने प्रख्यात व प्रतिषिद्ध सामानाची निर्यात करणाऱ्या व्यापाऱ्याची संपूर्ण संपत्ति राजाने जप्त करावी (मनु ७,३९९ com.)

**मंत्रः–** राजाने शौचमुखमार्जन, स्नान ब्राह्मणपूजा इ. आटोपल्यावर राजसभेत प्रवेश करावा, व तेथील प्रजेला विसर्जित करून मंत्र्यासह विचारविनिमय करावा. अथवा गिरिपृष्ठ, एकान्त प्रासाद वा जङ्गल प्रदेश इ. शांत व अज्ञात स्थळी जाऊन पञ्चाग मंत्राचा विचार करावा.

" सहायाः साधनोपायाः विभागो देशकालयोः ।
विनिपात प्रतीकारः सिद्धिः पञ्चाङ्गमिष्यते ।।

मूर्ख, मुका, बहिरा, पोपट, मैना व विशेषतः स्त्रिया मंत्रभेद करतात. त्यामुळे मंत्रसमयी त्याना विसर्जित करावे. धर्मार्थकामात विरोध येत असेल तर माध्यान्ही मंत्र्यासह किंवा एकट्यानेच चिंतन करून विरोध परिहार करावा. आणि समन्वय साधावा. राज्याचे वारस तदनंतर राजपुत्र असल्यामुळे तेच राजाचे शत्रू बनतात याची जाणीव सतत ठेवून राजाने त्यांना उचित शिक्षण व विनयाचे धडे द्यावेत असे मनूने सांगितले. व म्हणून " न विश्वसेत " हे बृहस्पतीचे सूत्र राज्यव्यवहारात अत्यंत महत्त्वाचे होऊन

बसले आहे. " राजपुत्र रक्षणम् " ( कौ. अ. अधि. १, अ, १७) मध्ये दुर्वृत्त राजपुत्राचा बंदोबस्त कसा करावा यासंबंधी कौटिल्याने अनेक प्रयोग सांगितले आहेत. तसेच अधि. १ अ. ५ यामध्ये राजा व्हावयास युवराजास व राजकुमारास उपयुक्त पडणारे कोणते शिक्षण कशा रीतीने द्यावे याविषयी विस्तृत विवेचन केलेले आहे :

" राजपुत्रस्य रक्षा च कर्तव्या पृथिवीभृता।
धर्मार्थकामशास्त्राणि धनुर्वेदं च शिक्षयेत॥ "
( अग्नि. अ. २२५ श्लोक १–३ )

**राजमंडलाचा** विचार योधधर्मात प्रामुख्याने होतो, आणि युद्धनीतीला राजनीतीत स्वतंत्र स्थान आहे तेव्हा याठिकाणी राजमंडलाचा विचार थोडक्यात करू:–

" मध्यमस्थप्रचारं च विजिगीषोश्च चेष्टितम् ।
उदासीनप्रचारं च शत्रोश्चैव प्रयत्नतः॥ "

मध्यम, विजिगीषु, उदासीन आणि शत्रू या चार मूलप्रकृतीच्या हालचालीचे ज्ञान प्राप्त करून राजाने क्रिया करावी.

"एताः प्रकृतयो मूलं मंडलस्य समासतः ।
अष्टौचान्याः समाख्याता द्वादशैव तु ताः स्मृताः॥ "

म्हणजे चार मूलप्रकृती+आठ शाखा प्रकृती=राजमंडलाची विचारभूत द्वादश प्रकृती. आठ शाखा प्रकृतीः ( १ ) मित्र ( २ ) अरिमित्र ( ३ ) मित्रामित्र ( ४ ) अरिमित्रमित्र हे चार शत्रुभूमीच्या पुढील व तसेच– ( १ ) पार्ष्णिग्राह ( २ ) आक्रंदन ( ३ ) पार्ष्णिग्राहसार आणि ( ४ ) आक्रंदनसार–हे चार शत्रुभूमीच्या पिछाडीचे शत्रु होय. या बारा प्रकृतीतील प्रत्येकीच्या ( १ ) अमात्य ( २ ) राष्ट्र ( ३ ) दुर्ग ( ४ ) कोश व ( ५ ) दंड अशा पाच द्रव्यप्रकृति असतात. म्हणजेच एकूण साठ द्रव्य प्रकृति होत, यात पूर्वोक्त बारा प्रकृति मिळवून " द्विसप्ततिः " ( ७२ ) प्रकृति मनूने निर्दिष्टिलेल्या आहेत.

**सारांशः**– चाणक्यनीतीत पुढील सुभाषित आहे–

" असंतुष्टो द्विजो नष्टाः संतुष्टश्च नराधिपः ।
सलज्जा गणिका नष्ट निर्लज्जा च कुलाङ्गना॥ "

'तेव्हा असंतोषः श्रियो मूलं' या वचनाची जाणीव ठेऊन राजाने प्रजेच्या योगक्षेमाची चिंता करावी व तद्प्रीत्यर्थ नानाविध कार्ये करावीत आणि ती करीत असताना "आत्मानं सततं रक्षेत् " या मनुवचनानुसार स्वसंरक्षणही करावे. भगवान् मनूच्या राजनीतीचे स्वरूप पुढील एकाच श्लोकातून स्पष्ट झाल्यासारखे वाटते:–

" बकवत् चिन्तयेत् अर्थान् सिंहवच्च पराक्रमेत् ।
वृकवच्चावलुम्पेत शशवच्च विनिष्पतेत्॥ "

राजाने एकांतात बगळ्याप्रमाणे राहून अर्थचिंतन करावे, प्रसंगी सिंहाप्रमाणे पराक्रम करावा, लांडग्याप्रमाणे शत्रूच्या संरक्षित वस्तूवर नजर चुकवून हल्ला करावा आणि सशाप्रमाणे शत्रूच्या तडाख्यातून अचूक निसटून जावे. कारण :

"विक्रोशन्त्यो यस्य राष्ट्राद्ध्रियन्ते दस्युभिः प्रजाः।
संपश्यतः सभृत्यस्य मृतः स न तु जीवति॥ "
" अराजके हि लोकेऽस्मिन् सर्वतो विद्रुते भयात् ।
रक्षार्थमस्य सर्वस्य राजानं असृजत् प्रभु॥ "

अराजक राज्यात माजू नये म्हणून ईश्वराने राजोत्पत्ती केली असे मनूने प्रतिपादिले आहे. वैदिक काळात राजाधीन शासनपद्धती प्रथमतः प्रचलित होती, तरी राजा हा स्वयंभूत असा नसून तो राष्ट्रपालनार्थ लोकनियुक्त असा अधिकारी होता असे ऐतरेय ब्राह्मणात स्पष्ट लिहिले आहे. कौटिल्याने त्याच तत्त्वाचा अनुवाद केलेला आहे. मनुस्मृति धर्माधिष्ठित आहे. अधिष्ठानातील फरकामुळे, राजा ईश्वरी अंश आहे (मनु), तो भृत्य आहे असा ( कौटिल्य ) विचारविरोध आढळत असला तरी अराजक नष्ट करणे हे त्याचे अवतारकृत्य सर्वमान्य आहे. राजा राजनीतिज्ञ असेल तरच अराजक नष्ट करून राज्याचे आनंदभुवन करून आत्मावताराचे सार्थक करू शकेल. कारण दण्डनीति ही– अलब्धलाभार्थी, लब्धपरिरक्षणी, रक्षितविवर्धनी व वृद्धस्य तीर्थेषु प्रतिपादिनी अशी चतुर्गुणात्मक आहे. म्हणून मनुप्रणीत राजनीतीचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. असे म्हणण्यात अतिशयोक्ती वाटत नाही.

अनुक्रमणिका

श्री. सेतुमाधवराव पगडी

# निजामुल्मुल्काचे अंतरंग

इ. स. १७२४ च्या आक्टोबर महिन्यात निजामुल्मुल्क याने फतेखर्ड्याच्या लढाईत आपला प्रतिस्पर्धी मुबारिजखान याचा पराजय केला. या लढाईत मुबारिजखान हा मारला गेला. त्यावेळेपासून निजामघराणे दक्षिणेत स्थिर झाले. लढाईपूर्वी निजामाने मराठ्यांच्या चौथाई आणि सरदेशमुखी या हक्कांना मान्यता दिली होती. निजामुल्मुल्काचा अधिकारी आणि चरित्रकार महंमद कासीम हा आपल्या 'अहवाले खवाकीन' या ग्रंथात म्हणतो "निजामुल्मुल्काला माहीत होते की मोगलदरबारात आपल्याला विरोध करणारे पुष्कळ आहेत आणि हा विरोध ते बादशहाच्या आज्ञेने करीत आहेत. म्हणून त्याने मराठ्यांच्या बरोबर आपले सलोख्याचे संबंध दृढ केले. सय्यद हुसेन अलीखानाने ठरवून दिल्याप्रमाणे त्याने मराठ्यांना चौथाई देण्याचे कबूल केले."

मुबारिजखानाला नाहीसा केल्यानंतर दक्षिणच्या सहा सुभ्यात आपला जम बसविण्याचे काम निजामाने हाती घेतले. इ. स. १७२५ मधे त्याने गोवळकोंड्याचा किल्ला आपल्या ताब्यात आणला आणि तेलंगणातील अप्पाराव जमीनदाराचे बंड मोडून काढले. हैदराबादच्या कर्नाटक भागातील पठाण सरदार, कडपा, कर्नूल, बंकापूर (सावनूर) चे पठाण नवाब हे अगदी निरंकुश झाले होते. त्याना वठणीवर आणणे भाग होते. अर्काटचा मोगल फौजदार हा एखाद्या स्वतंत्र संस्थानिकाप्रमाणे वागत होता. सोंधे, बिदनूर, म्हैसूर इत्यादींच्या राजांकडून खंडणी वसूल होत नव्हती. या खंडणीतील आपला हक्क वसूल करण्यासाठी मराठ्यांनी १७२६–२७ मधे कर्नाटकात दोनदा मोहिमा काढल्या. निजामाला त्या प्रांतांत मराठ्यांचे वाढते वर्चस्व नको होते. या कारणाने इ. स. १७२६ आणि १७२७ मधे तो कडपा, कर्नूल, अधोनी या ठिकाणी गेला. आणि त्याने तिकडील पठाण सरदार, अर्काटचे नबाब, आणि मांडलिक राजे यांचा बंदोबस्त केला.

## मराठ्यांविषयी धोरण

चौथाई सरदेशमुखीचा मराठ्यांचा हक्क निजामाने मान्य केला होता खरा पण तो अमलात यावा अशी त्याची इच्छा नव्हती. सनदांप्रमाणे मराठ्यांना निजामाच्या राज्यात आपले अधिकारी नेमून चौथाई सरदेशमुखी वसूल करण्याचा हक्क मिळाला होता. वऱ्हाडात कान्होजी भोसले, गोदावरी प्रांतात फत्तेसिंग भोसले, दावलजी सोमवंशी, गोरखोजी भापकर इत्यादि सरदार मातबर सरंजाम बरोबर बाळगून चौथाई गोळा करीत फिरत होते. निजामाला हे असह्य होत होते पण यावर काय उपाय करावा हे त्याला समजत नव्हते.

ती संधी आयती चालून आली. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर अनेक मराठे सरदार मोगलांच्या चाकरीत प्रविष्ट झाले होते. यातील प्रमुख म्हणजे रंभाजी निंबाळकर हा होय. इ. स. १७१३ मध्ये चंद्रसेन जाधव हा निजामाला येऊन मिळाला; इ. स. १७२६ मध्ये कोल्हापूरकर संभाजी याने चंद्रसेनाच्या मध्यस्थीने निजामाशी बोलणे लाविले. त्याला आपल्याकडे मिळवून घेऊन शाहू आणि बाजीराव यांना आपण हतप्रभ करू शकू अशी निजामाला खात्री वाटू लागली. इ. स. १७२७ च्या सुरवातीला निजाम हा अधोनीहून गुलबर्गास आला. तेथून तो पावसाळ्याच्या छावणीसाठी म्हणून बीड जिल्ह्यांतील धारूर येथे आला.

## सुल्तानजी निंबाळकर

सप्टेंबर १७२७ च्या सुमारास शाहूचा सरलष्कर सुल्तानजी निंबाळकर हा धारूर येथे निजामाला येऊन मिळाला. त्याच्यावर निजामाची किती भिस्त होती हे पुढील उद्गारावरून समजेल.

"सुल्तानजीचा इतका भरवसा नवाबसाहेबांस होता जे वीस हजार फौज मेळवून बाजीरायास मोडील परंतु काहीच न जाहले" (पेशवे दप्तर खंड दहा, पत्र क्रमांक ७२ तारीख सात नोव्हेंबर १७३०, पान ६६.)

पण निजामाचे बेत हाणून पाडले ते बाजीरावाने. रणात यश मिळविणे हा निजामाला वठणीवर आणण्याचा एकमेव मार्ग आहे हे बाजीरावाने ओळखले. नोव्हेंबर १७२७ पासून मार्च १७२८ पर्यंत निजाम आणि बाजीराव यांचा संघर्ष चालू होता. शेवटी बाजीरावाने पालखेड येथे निजामाला कोंडले आणि त्याच्याकडून शाहूचे चौथाई सरदेशमुखीचे हक्क मान्य करून घेतले.








१७२९

पालखेडच्या मोहिमेनंतर निजाम हैदराबादेस आला. तेलंगणात अप्पाराव जमीनदार यांचा भाऊ सोमण्णा याने बंड केले होते. जानेवारी १७२९ मधे ते मोडण्यात निजाम गुंतला होता. गुलबर्ग्याजवळील बेडरांचा बंदोबस्त करून तो बुऱ्हाणपुरास आला. मराठ्यांचे आपसातील मतभेद हे त्याच्या पथ्यावर पडू लागले होते. शाहूचा अधिकारी चिमणाजी दामोदर हा निजामाला येऊन मिळाला. वऱ्हाडात कान्होजो भोसले हा शाहूला जुमानीनासा झाला होता. त्याला वठणीवर आणण्यासाठी शाहूने राणोजी व रघोजी भोसले यास वऱ्हाडात पाठविले. हे पाहून कान्होजी हा निजामाला येऊन मिळण्याचा विचार करू लागला. शाहूचा प्रतिनिधि श्रीपतराव याला निजामाने जबर प्रलोभने दाखवून हैदराबाद सुभ्यापुरती चौथाई माफ करवून देण्याचे त्याच्याकडून वचन घेतले होते.

"ताम्रांचेच मुत्सद्दी याचे येथे तत्वता आयकिले की रा. श्रीपतराव व रा. कान्होजी भोसले याही भागानगरचे कार्य करून द्यावे म्हणजे रा. कान्होजी भोसले यास चांद्याचे राज्य नबाबाही द्यावे आणि निराळे राजे ऐसे नाव म्हणवावे व श्रीपतरावजीसही त्या राज्यात विभाग काही मुलुख द्यावा. यैसा येकांत दृढनिश्चये झाला आहे." ( पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक ३९ पान ३४ ).

वर ठरल्याप्रमाणे श्रीपतरावने निजामासाठी भागानगरची चौथाई माफ करवून घेतली (सप्टेंबर १७२९). हे केले नाही तर आपण निजामाला जाऊन मिळू अशी धमकी देण्यासही त्याने कमी केले नाही.

" जर भागानगरचे न बनले तर मी कुल सेनेसहवर्तमान नबाबापाशी येईन हे तत्वता आहे" ( पे. द. खंड १० पत्र क्रमांक ८१, पांच मे १७२९ पान ७७ ).

" रा. कान्होजी भोसले मोगलाईत निश्चये येत आहेत. हिरजुल्लाखान माहोरचा सुभा त्यांचे सरंजामाबद्दल नबाबा जवळी आला आहे. रदबदली आहे. जाहगीर यासी मन सब पोखता सरंजाम देत आहेत."

तोपर्यंत मराठ्यांनी माळव्यामधे धूम उडवून दिली होती. चिमाजी अप्पाच्या दणदणीत विजयामुळे मराठ्यांचा माळव्यात जम बसला होता. आपण मराठ्यांची आक्रमणे रोखीत आहोत असे निजाम मोगल दरबारात लिही. पण हा मराठ्यांशी आतून सामील असला पाहिजे, असाच संशय बादशहाच्या मनात होता. मराठे उत्तरेकडे जात. त्याना निकराने थोपवून धरण्याचा निजामाने कधीच प्रयत्न केला नाही. त्यामुळे बादशहाच्या मनातील संशय अधिकच बळावला.

इ. स. १७३० मधे चांदा देवगड भागात मोहीम करून निजाम वऱ्हाडात आला, दाभाडे आणि पेशवे यांचे मतभेद विकोपाला गेले होते. यामुळे निजाम हर्षभरित झाला. प्रतिनिधि आणि मराठ्यांचा वकील आनंदराव सुमंत यांच्या सांगण्यावरून निजामाची समजूत झाली की शाहूचे आणि बाजीरावाचे आपसात बरे नाही. मराठे सरदारही बाजीरावांना मिळणार नाहीत. दाभाडे आणि कंठाजी कदम बांडे हे तर निजामाला म्हणत होते की तुम्ही फक्त आम्हाला नैतिक पाठिंबा द्या. आमचा पराजय झाला तर आम्हाला जहागिरी मन्सबी द्या. आमचा जय झाला तर आम्ही शाहू हा विनाकारण भांडणे लावतो असे निमित्त करून त्याला गादीवरून काढून टाकू आणि संभाजीला बसवू. निजाम तर शाहूला नादान आणि दुबळा समजत होता. मराठे सरदार या ना त्या कारणांनी निजामाला कसे येऊन मिळू पाहात होते त्याचे चित्र पुढील पत्रात पहा :

" सैदाचे वेळेस कैलासवासी तीर्थरूप नानांही बंदोबस्त केला होता जे, त्याजवेगळी मोगलाईंत कोन्हास वाट नव्हती. आता श्रीपतराव जाहाले, मऱ्हाठे सरदार जाहाले, कानोजी आदि करून सर्व वकील पाठवून वर्तमान लिहिताती, यामुळे ताम्रांस फितवा झाला" ( पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक ६० पान ५० ) इ. स. १७२९ मध्ये तेलंगणचा बंदोबस्त करून निजाम वऱ्हाड देवगड प्रांतात चालून गेला. तेथे नरखेड मुक्कामी ( नागपुर जिल्ह्यात ) श्रीपतराव प्रतिनिधीने त्याची भेट घेतली. त्याला उद्देशून पुढील वाक्य आहे :

" तुम्हीच लिहिणे जे निजाम नरखेडावर श्रीपतराव भेटले ते पासून किंबहुना श्रीरंगपटनापासून नवली फिरवून बेइमान झाली आहे. " ( पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक ६० )

**१७३०**

इ. स. १७३० मध्ये निजाम कर्नाटकाकडे जाण्यासाठी निघाला पण वऱ्हाडात राणोजी आणि रघोजी भोसले यांनी धुमाकूळ घातल्यामुळे त्याला गोदावरीच्या काठावरून परत वऱ्हाडाकडे जावे लागले. इ. स. १७३० च्या हिवाळ्यात तो वऱ्हाड, बागलाण आणि खानदेश या भागात हिंडत होता. दाभाडे आणि पेशवे यांचे मतभेद विकोपास गेले तसे निजामाला वाटू लागले की, शाहू नादान आहे आणि मराठे सरदार काही बाजीरावाला मिळणार नाहीत. बाजीरावाची खोड मोडावी असे त्याला पुन्हा वाटू लागले. या काळातील मराठा वकीलांनी लिहिलेली अनेक पत्रे उपलब्ध झाली आहेत. निजामाने वळोवेळी जे उद्‌गार काढले आहेत ते पहा :

जयपुरचा वकील दीपसिंग याजबरोबर संभाषणः- "(सहा नोव्हेंबर १७३०). मग पुसिले जे, राजा (शाहू) खुद कसा आहे ? यांनी उत्तर दिल्हे जे की राजाहि बहुतच खुबिया राखतो. नवाबांनी उत्तर दिल्हे जे आम्ही आयिकिले जे कितेक गोष्टी हलकेपणाच्या आइकतो" "मजवर बाजीरायाचा इतबार अगर अदमीयतेची वचनाची सत्यता वाटत नाही ... गरूर (गर्व) प्रधानपंतास फार जाहला आहे. एक पारपत्य करणे जरूर आहे" यांनी उत्तर दिल्हे जे तुम्ही पातशाही गैरराजी आणि ऐशा मोहरियाशी तुम्हास बिगाडने उचित नाही. आम्हीही खैरखाहीने सांगतो. बाजीराव लाख फौज मेलवील तर मिलेल ऐसे दिसते." निजाम म्हणाला, "आजी बाजीरायांस एक वेल तंबी करतो. सिदोजी निंबाळकर व कंठाजी बांडे व उदाजी पवार व कान्होजी भोसले ऐसे पन्नास हजार स्वार समेत गायकवाड होती त्यानीच शर्त केली की बाजीराउजीस धरून देतो अगर धुडावितो. फौज लुटून घेतो. यैशा पराक्रमाच्या गोष्टी बहुत त्याजपाशी गोस्टी सांगितल्या." (पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक ६६ तारीख सहा नोव्हेंबर १७३०).

"लोकचर्चा की राऊ सुमंतांनी सांगितले जे राजश्री बाजीरायास नवाबांनी तंबी पोहचविले तरी राजे वाईट माननार नाहीत व राजियाचे राज्य बुडत नाही. अवघे मऱ्हाटेही खूष होतील यैसे सांगितले म्हणून बाजारु गप्पा. परंतु तसेच दिसते." (खंड १० पत्र क्रमांक ६५ सहा नोव्हेंबर १७३०).

दाभाड्यांच्या पत्रांमुळे तर निजामाचा गैरसमज अधिकच बळावला "नवाबाने उमाबाईंची व कंठाजीची पत्रे आली तेव्हा या दोघासी विचार केला जे या प्रकारची पत्रे आली आहेत जे, काही कवडी मागत नाहीत फुकाचा आश्रय मात्र नवाबाचा असावा. म्हणजे प्रधानपंतास आम्ही युद्ध करून मोडू. जर त्यानी आम्हास मोडिले तर मग तुम्ही जागिरा व मन्सब द्यावी. आनी आम्ही मोडिले तर राजा शाहूचे राज्य बुडवितो की राजाच आम्हास भांडवितो. राज्य बुडाल्यावर संभाजी राजियास राजी स्थापून त्र्यंबकराव सेनापती व कंठोजीस सरलष्कर द्यावे म्हणजे नवाबाचाही बोलबाला होत आहे." यावर निजामाचा सल्लागार (अन्वरखान अगर अब्दुल्लाखान खानसामा) याने शंका व्यक्त केली की "हा मजकूर पहिल्यासारखा संभाजीचे वेलेचाचसा दिसतो. सुल्तानजीचा इतका भरवसा नवाबसाहेबास होता जे वीस हजार फौज मेळवून बाजीरावास मोडील. परंतु काहीच न जाहले. तसेच हेहि आहे. कंठाजीचा तेव्हांहि वकील आला होता. आखीर तिकडेच राहिला. याचा इतबार धरावासा नाही."

**निजामाचे उद्गार**

"मग नबाब सरसाऊन बसोन जाब दिल्हा की मजला संभाजीची सिरचोए लागली आहे की एक वेळ रात्री बैसवावे व शाहूस मोडावे. अनायासे मनसुबा फुकटाफाकट आला आहे. घरात कलह लागोन जो मोडेल तोच उणा जाहला. आपले काय गेले. यैसे बोलिला. नवाबाने आनीक जाब दिल्हा जे "बाजीरायांनी कंठाजी वगैरेस मोडिले तरी उत्तमच आहे... शाहू राजियांचेहि मनोगत आपणास चिमणाजीपंत, सुल्तानजी. निंबाळकरानी व बोलता बोलता आनंदरायांनी आम्हास सांगितले की बाजीरायासी काय, की तुम्ही सर्वासी बिगाड कराल आनि एक राजा मात्रांसी लटकाच सलूख ठेवाल, तऱ्ही राज्यास सलूक मान्य." (पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक ७२ पान ६६ व ६७)

निजामाच्या सल्लागारांपैकी हाजी महमद अलीखान हा होता. पेशवे दप्तरात त्याचा उल्लेख दिकारपूर्वक असा आलेला आहे. त्याला निजामाचे हे धोरण मान्य नव्हते. त्याने पेशव्यांच्या वकीलास सल्ला दिला की

" सांगणारानी निशा केली की बाजीरायासी कोन्ही मराठी फौज राजीयाची शामील होत नाही, म्हणोन निशा केली आहे व दावलजी ( सोमवंशी ) व फत्तेसिंग ( भोसले ) यासी हे वऱ्हाडात येऊ देत नाही. राजिया हातीच राजियाचे मुतसदी घाट घडोन ठेविला आनि नवाबास लिहिले आहे. यैसियासी शाहू राजियास राज्य राखने असेल व बाजीरायासही या गोष्टींचा अहंकार असेल तर दावलजी व फत्तेसिंग रायाचे फौजेस शामील जाहाले म्हणजे नवाबाचे डोळे उघडतील. "
( पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक ७२ पान ६८ )

इ. स. १७३० च्या नोव्हेंबर डिसेंबर महिन्यात निजाम हा खानदेश आणि बागलाण येथील लहान सहान जमिनदारांच्या गढ्या उद्ध्वस्त करण्यात गुंतला होता. सात नोव्हेंबर १७३० चे पत्र "आज तागायत आटोलियाच्या सात गढिया लुटून गाव पेठ वस्त भाव कुल लुटून गढिया पाडिल्या. "

" भावसिंग ठोके ... याचे पारिपत्य झाले पाहिजे आणि नागोजी पाटील मौजे मलगाव परगणे निंबाईत याने दहावीस वर्षे पुंडावे करून उपसर्ग केला. त्यांस नतिजा देऊन, रयेतीचे बरे करावे या करिता नवाब निजामन मुल्क याणी उभयेतावर मोहीम करून, मौजे मुदाणे येथे मुकामास आले. "

कान्होजी भोसले आपल्याकडे येईल असे निजामाला वाटले होते. पण राणोजी आणि रघोजी भोसले हे वऱ्हाडात घुसले आणि त्यांनी कान्होजीचा मोड करून त्याला कैद करून साताऱ्यास पाठविले ( इ. स. १७३१ ). मराठ्यांचा चौथाईचाही अंमल सुरळीत चालू द्यायचा नाही असा निजामाचा सततचा प्रयत्न असे. हैदराबाद सुभ्याची चौथाई त्याने माफ करवून घेतली होती. औरंगाबाद, बीदर, विजापुर, खानदेश आणि वऱ्हाड येथे चौथाईचा अंमल चालू होता. तो शक्य तितके अडविण्याचे धोरण निजामाने चालू केले होते. तुमच्या कमाविसदारांबरोबर सैन्याच्या तुकड्या काय म्हणून, तुमचे सरदार काय म्हणून धामधूम करतात. आम्ही चौथाई रास्त वसूल करून देऊ असा खाक्या त्याने आणला.

" विजापुरची चौथाई उडविली. भागानगर तसे घेतले. बिवारसी ठाणी गनिमाची उठविली. तिकडे चौथाईचा सुरलित अंमलच नव्हता. राहिले तीन सुभे. आम्ही इकडेही आलो. दावलजीस व फतेसिंग बाबास इकडे येऊ देत नाही. टका पैका येक वरीस यांचे हाती न लागला म्हणजे सहजच बुडतील. यैसे येसे मनसुबा गयासखानाचे व नवाबाचे तूर्त आहे ती "
( तारीख सात नोव्हेंबर १७३० पत्र क्रमांक ७२ )

पण निजामाच्या या धोरणाला मराठे थोडेच भीक घालणार होते. रघोजी भोसल्याने वऱ्हाडात ( त्यात मराठवाड्याचा परभणी जिल्हा आला. ) विलक्षण धामधूम उडविली. निजामाचे सेनापति हिर्मुल्लाखान, जमीलबेगखान, सय्यद जमालखान, सय्यद लष्करखान इत्यादींशी रघूजीच्या अनेक चकमकी झाल्या. पण रघोजीने वऱ्हाडवरची आपली मगरमिठी सोडली नाही. वर्धेच्या पूर्वेकडील गोंडराजांवरील आपला अंमल निजाम दृढ करू पाहात होता. पण तोही रघूजीने उडवून लाविला. वऱ्हाडचा एक निजामी सुभेदार शुजातखान हा रघोजीशी लढताना मारला गेला ( इ. स. १७३७). रघोजीने गोंडराजांना बाजूस सारून नागपुर आणि चांदा येथे आपली सत्ता स्थापन केली ( १७४० ), हे सगळे निजामुल्मुल्काच्या हयातीतच घडले. औरंगाबाद, विजापुर, बेदर आणि खानदेश या सुभ्यातून मराठ्यांची आक्रमणे कधीच थांबली नाहीत. निजामाचे हे धोरण यशस्वी झाले नाही.

## १७३१

एकीकडे दाभाड्यांच्या बरोबर कारस्थाने चालू होती तर दुसरीकडे मराठे माझ्या राज्यात विनाकारण धामधूम करीत असतात अशी निजामाची सारखी तक्रार चालू असे. बागलाणांतील भाऊसिंग ठोके याच्यावर निजामाने स्वारी करून त्याला त्याच्या गढीतून काढून लावले. तो बाजीरावाकडे गेला. याबद्दल निजामाने शाहूकडे तक्रार केली. ( नउ डिसेंबर १७३० चे पत्र; " नवाब बहुत श्रमी होऊन बोलिले की, आमचा व माहाराजांचा स्नेह चालत असता, आमचा मुलूक मारावा, ठाणेदार धरावा, हे गोष्टी उचित की काय ? भावसिंग ठोके याजवर आम्ही मसलत केली असता त्यास चाकरीस ठेवावे हे गोष्टी उचित कीं काय ? " (पेशवे दप्तर खंड दहा पत्र क्रमांक ७५ पान ७१ ).

शाहूचे धोरण निजामाशी शांततेने राहावे असे होते. वरील पत्रात बाजीरावाला त्याने आज्ञा केली की



अनुक्रमणिका

" भावसिंग ठोके यांस चाकरीस न ठेविता त्यास निरोप दिल्हा पाहिजे. नवाब खानदेश प्रांते आले आहेत. ते कुली ठाणी उठवितील. तरी तुम्ही ते गोष्टी-मध्ये मन घालावे यैसे नाही. "

आणि याच वेळी निजाम, आपल्या सल्लागारांसमोर शाहूची दुबळा आणि नादान म्हणून हेटाळणी करीत होता.

इ. स. १७३१ मधे महंमद बंगश हा माळव्याचा सुभेदार होऊन आला. मोगल दरबार निजामाकडे साशंक नजरेने पाहात होते. त्यामुळे दिल्लीहून कोणी मोगल सरदार निघाला की निजामाला वाटे की ही मोहीम आपल्या विरुद्ध आहे. दक्षिणचे सहा सुभे आपल्या ताब्यात आणून निजामाचे समाधान झाले नाही. त्याला माळवा, गुजरात हेही सुभे हवे होते. इ. स. १७२९ मधे त्याने माळव्यासंबंधी प्रयत्न केला होता. पण तो यशस्वी झाला नाही.

" दिल्लीस पादशाहीस लिहिले आहे की, पंतप्रधान दरसाल जाऊन माळव्याचा मुलुक मारून खराब केला. आपण तिकडे जाऊन पारपत्य करावे तरी हुकूम पाहिजे. जरी हुकूम आला, माळव्याची सुभेदारी आपणास दिधल्याने त्या देशात बंदोबस्त करू. " ( पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक २७ पान २२ तारीख सतरा एप्रील १७२९ )

निजाम आणि महंमद बंगश यांची गाठ १७३१ च्या मार्च महिन्यात पडली. या भेटीत काय घडले याबद्दल फारसी आणि मराठी साधने विशेष तपशील देत नाहीत. दक्षिणेतील आपले राज्य सुरक्षित ठेवणे हे आपले पहिले काम. ते सांभाळून माळव्यातील बंदोबस्तासाठी मोगल दरबारशी सहकार्य करता येत असेल तर उत्तम अशी त्याची भूमिका होती. दरवर्षी माळवा बुंदेलखंड या प्रांतात मराठे स्वाऱ्या करीत. निजामाकडून त्यांच्या या स्वाऱ्यांना उपसर्ग झाला नाही. त्याने मनात आणले असते तर मराठ्यांना अडविणे त्याला अशक्य नव्हते. त्याचा प्रतिकार यशस्वी झाला नसता ही गोष्ट वेगळी. पण मराठ्यांना माळव्यावरील आक्रमणात अडचणी उद्भवल्या असत्या हे निश्चित होय. '' यानी विचार केला जे बिगाड तर करू नये, चौथ तर रास्ती देऊ नये. हे गुजरात माळवियात जाताली तसे जाऊ द्यावे. " ( पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक ७२ तारीख सात नोव्हेंबर १७३० पान ६७ ) हे मराठा वकीलाचे उद्गार सार्थ वाटतात. मराठे माळव्यास दरवर्षी स्वाऱ्या करीत. पण निजाम त्याना अडवीत नाही. उलट मोगल दरबार आपल्याशी सहकार्य करीत नाही. मराठ्यांशी आपल्याला एकट्याला लढावे लागत आहे बादशहा आणि दरबारची मंडळी मला विनाकारण पाण्यात पाहातात अशी तो तक्रार करतो. मोगल दरबारची पक्की खात्री होती की निजामाचे मराठयाशी अंतस्थ सूत असल्याशिवाय मराठे निर्वेधपणे माळव्यात घुसणे शक्य नाही. इ. स. १७२९चे हे पत्र पाहा. पेशवे उत्तरेत छत्रसालाच्या मदतीला चालले होते. त्याना अडविणे हे निजामाचे काम होते. पण ती भाधाच निजामाचे अधिकारी काढीत ना.

" त्यास श्रीमंत राजश्रीची स्वारी गोदातीरास आली त्यास नबाब येवजखानजींनी रा. गणेशपंत कुंटे यास पाठवून सलूख केला की . आपली जागीर वऱ्हाडी आहे. त्या प्रांतामध्ये न जावे. माहोर प्रांतामधून देवगडी प्रांते जावे यैसा पैगाम केला तो राजश्रीनी मान्य केले. . .नबाब निजामुन मुल्क भागानगर प्रांते महिदर्गी प्रांते ( राजमहेंद्री ) अपाराय यळमा याच्या गढीवर आहेत यैसे वर्तमान आहे. " ( तारीख दहा जानेवारी १७२९ पत्रक्रमांक ३४, खंड १३ पेशवेदप्तर पान ३३ )

इ. स. १७२९ मध्ये महंमद बंगश हा अलाहाबादचा सुभेदार होता. बाजीराव त्याच्यावर चाल करून जात होता. त्याला अडविणे हे निजामाचे काम होते. महंमद बंगश हा मोगलांचाच सुभेदार आणि निजाम हा आपण मोगल साम्राज्याचे एकनिष्ठ सेवक आहो अशा गप्पा मारतो. ही साम्राज्यनिष्ठा कोठेच आढळून येत नाही.

इ. स. १७३१ची बंगश निजाम भेट ही निष्फळच समजली पाहिजे. निजामाला बंगशाचे अंतरंग समजून घ्यावयाचे होते. हा आपल्या विरुद्ध तर नाहीना या गोष्टीचा त्याला छडा लावायचा होता. बंगशाला माळव्यात मराठ्यांचा बंदोबस्त करणे प्राप्त होते. या कामात त्याला निजामाची मदत हवी होती. आणि निजाम काय मदत करणार हे त्याचे धोरण पाहता दिसतच होते. त्याने अघळपघळ गप्पा मारल्या. मराठयांशी मी










असा लढत आहे तसा लढत आहे पण केंद्रसरकार माझे काही कौतुक करीत नाही. मदत तर नाहीच नाही अशी त्याने तक्रार केली. मोंगल दरबारला निजामाचा जो संशय आला तो बंगशने त्याच्या कानावर घातला असला पाहिजे.

बंगश निजाम मुलाखत संपते न संपते तोच बाजीरावाने गुजरातेत चाल करून त्र्यंबकराव दाभाडे याचा पराजय केला ( १ एप्रील १७३१ ). निजामाचे थोडेसे सैन्य दाभाडयाच्या बाजूने लढत होते. निजामाने बाजीरावाचा पाठलाग केल्याचे सोंग केले आणि मे अखेरीस तो औरंगाबादेस परत आला. मोंगल बादशहाला त्याने बढाईची पत्रे लिहून आपण बाजीरावाला कसे नामोहरम केले याचे रसभरित वर्णन केले आहे आणि "परमेश्वर कृपेने गुजरातेतून बाजीरावाला घालवून देण्यात आले आणि माळव्यावरील या वर्षीचे संकट टळले" असे उद्गार काढले (मराठे व निजाम, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय प्रकाशन, पान १६४)

निजामाची दाभाडयांबरोबरची कारस्थाने धुळीला मिळाली. त्याने बाजीरावाशी लुटपुटी लढाई केली. पण त्याला काळजी पडली ती ही की न जाणो बाजीराव खरोखरीच आपल्यावर चाल करून यावयाचा. इकडे बादशहाला आपण यंव केले त्यंव केले म्हणून लिहिणारा निजाम, बाजीरावाच्या वकीलाशी बोलताना कशी गयावयाची भाषा वापरतो पहा : (बावीस जून १७३१ चे पत्र )

"तर राजश्री पंतप्रधान यांचे पत्र आलियावर नवाबास परिछिन्न पुसिले की तुम्हास त्यासी युद्धास जाणे आहे तरी आम्हास निरोप देणे. पूर्वी सुरत प्रांतात राजश्री पंतप्रधान यासी बिगाडास चालिले तेव्हां आम्ही निरोप घेऊन गेलो तैसाच आताहि निरोप मागत होतो की यावरून नवाबाचा खुलासा निघेल. तेव्हां नवाबानी बहुत समाधान केले की खुदानखास्ता बाशद ( परमेश्वर न करो ) आपनास राजश्री पंतप्रधानासी बिगाड सहसा करणे नाही. बिगाड करणे असता तर आम्ही अगोदर औरंगाबादेस आलो होतो राजश्री पंतप्रधान मागून आले. तेव्हाच जाऊ न देतो. बिगाड होता अथवा मागे मागे जाऊन पोहोंचतो अथवा आताही बिगडास जातो तर तुम्हास साफ सांगतो. भय काय आहे ? आखरश ( शेवटी ) गोष्ट झाकत नाही. परंतु माझे चित्तात हे गोष्टच नाही मग चिंता काय. वडील वडिलापासून पातशहाचे नवाजीश दरम्यान डाग थोडासा लागला. आपला बाचायाचा भरवसा काय. पुढे लेकराबालास निमकहरामीचा शब्द लागल म्हणौन लाजस्तव जातो ते राजश्री पंतप्रधान यांस तीस चालीस कोस डावे उजवे टाकून जाईन. मजवर शब्द ठेवतात मी मल्हास्टास जाऊन पातशाही मुलुख खराब केला याचाही परिहार केला पाहिजे म्हणौन जातो..." ( पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक ३४ पान २९ )

## १७३२

इ. स. १७३२ च्या डिसेंबर सत्तावीस तारखेस निजामुल्मुल्क आणि बाजीराव यांची भेट रोहे रामेश्वर ( मराठवाड्यात, लातूर जवळ ) येथे झाली. या भेटीत काय ठरले याचा तपशील कोठेच बाहेर आला नाही. पण बाजीरावाच्या उत्तरेकडील राजकारणात आपण विरोध करणार नाही. आपल्या मुभ्याला पेशव्यांनी उपसर्ग लावू नये अशा प्रकारची बोलणी झाली असणे शक्य आहे.

निजामाची आणखी एक डोकेदुखी म्हणजे कर्नाटकातील पठाण सरदारांबद्दलची होय. हे सरदार मूळचे विजापूर राज्याचे सेवक. औरंगजेबाने विजापूरचे राज्य खालसा केल्यावर हे मोगलांना मिळाले. कडपा आणि सावनूर बंकापूरचे पठाण हे विजापूरचा वजीर बहलोलखान यांचे वंशज, कर्नूलचे नबाब हे दाऊदखान पन्नीचे नातेवाईक. धारवाड, केरूर, बेळगाव, बंकापूर हे किल्ले सावनूरकरांच्या ताब्यात. हे पठाण सरदार म्हणजे नाठाळ बैलाप्रमाणे होते. दक्षिणच्या सुभेदारांना ते जुमानीत नसत. अर्काटचा नवाब हाही स्वतंत्र संस्थानिकाप्रमाणे वागे. या सर्वांचा बंदोबस्त करण्याचा निजामाने प्रयत्न केला. पण त्यात त्याला यावे तसे यश आले नाही. याचा पुरावा हा की निजामुल्मुल्काच्या हयातीतच या पठाण नवाबांनी विजापुरच्या सुभेदाराचा खून केला. निजामुल्मुल्काच्या मृत्यूनंतर अवघ्या दोन वर्षांत त्याचा मुलगा नासिरजंग आणि नातु मुजफ्फरजंग यांचेही खून या पठाण सरदारांनीच केले.

## १७३३

इ. स. १७३३ मध्ये निजामुल्मुल्क हा हैदराबाद आणि कर्नाटक या भागात होता. पेशव्यांच्या पराक्रमापुढे त्याची मात्रा चालेनाशी झाली. पण मराठ्यांना आतून जितक्या अडचणी निर्माण करता येतील तितक्या करण्यास तो मागेपुढे पाहात नसे. इ. स. १७३३ मध्ये मराठ्यांनी जंजिऱ्याच्या हबशांच्या विरुद्ध मोहीम सुरू करून पाच जून १७३३ रोजी रायगडचा किल्ला घेतला. इकडे निजामही हबशांना पत्रे लिहून त्यांना आपला प्रतिकार चालू ठेवण्यास प्रवृत्त करीत होता. तेवीस आक्टोबर १७३३ चे पत्र गुलबर्ग्याहून लिहिले गेले आहे.

" काल बुधवारी येक घटका खलबतात निघाले होते. त्यास हबसियांकडील मसुदे नीट करून त्याहावयासी दिले. " ( पेशवे दप्तर खंड ३० क्रमांक ९८ पान ७२ )

निजामाची हबशांबरोबर कारस्थाने पुढे दोन तीन वर्षे चालली होती : (सात जानेवारी १७३६ चे पत्र)

" हबशी यानी बानकोट घेतला (५–१२–१७३५ ) व चिपलोन मारोन बंद मवेशी फार नेली. हे नवाबास आर्ज आला. नवाबांनी यासी आंतस्थे लिहिले की उपाधी फार करणे. " या पलीकडे काही मदत करणे निजामाच्या हातात नव्हते.

## १७३४

माळव्यावरील होणाऱ्या मराठ्यांच्या सततच्या आक्रमणांनी बेजार होऊन दिल्ली दरबारने शेवटी माळव्यात फौजा पाठविण्याचे ठरविले. पण मराठ्यांचा धाक आणि मोगल सरदारांचा अवसानघातकीपणा यामुळे या मोहिमातून मोगलांना फजीत पावून दिल्लीस परत जावे लागले. त्यांचा तपशील असा :

दिल्लीचा वजीर कमरुद्दीन हा २७ मार्च १७३३ रोजी दिल्लीहून निघाला. तो बुंदेलखंडापर्यंत कसाबसा पोहोचला आणि हात हलवीत २८ जुलै १७३३ ला दिल्लीस परत गेला. मोगलसरदार मुजफ्फरखान हा फेब्रुवारी १७३४ मधे दिल्लीहून निघाला. तो माळव्यात सिरोजपर्यंत आला. तेथून तो जून १७३४ मधे दिल्लीस परत गेला.

वजीर कमरुद्दीन हा १० नोव्हेंबर १७३४ रोजी दिल्लीहून निघाला. फेब्रुवारी १७३५ मधे त्याची नरवर येथे पिलाजी जाधवाशी चकमक झाली. नंतर तो दिल्लीस परत गेला.

खानदौरान याने नोव्हेंबर १७३४ मधे दिल्ली सोडली. तो माळव्यात रामपुऱ्यापर्यंत पोहोचला ( फेब्रुवारी १७३५ ) होळकराच्या बरोबर त्याच्या चकमकी झाल्या. एप्रिल १७३५ मधे तो दिल्लीस परत गेला.

उत्तरेत या हालचाली चालू असता निजाम हा बुऱ्हाणपुरात स्वस्थ तमाशा पाहात होता. मराठ्यांनी उत्तरेत जाऊ नये अशा प्रकारचा त्याने काही प्रयत्न केला नाही. निजामाचे हे धोरण मोठे सूचक आहे. याच काळातील मराठ्यांच्या हालचाली पहा :

चिमाजी अप्पा माळव्यात १८ जानेवारी १७३३. तेथून तो बुंदेलखंडात गेला. तेथून २२ एप्रिलला परत फिरून तो सात जूनला पुण्यास पोहोचला.

याच वर्षीच्या फेब्रुवारी महिन्यात होळकराने माळव्यात स्वारी करून जयसिंग यास तह करण्यास भाग पाडले. १७३३ च्या दसऱ्यानंतर पिलाजी जाधवाने माळव्यात स्वारी केली. तो १७३४ एप्रिलनंतर परत आला. इ.स. १७३४ च्या नोव्हेंबर महिन्यात पिलाजी जाधव पुन्हा माळव्यात घुसला, कुरवाई, नरवर, ही स्थळे करीत तो मे १७३५ अखेर पुण्यास परत आला.

## १७३५

इ. स. १७३५ मधे शिंदे होळकर यांनी माळव्यात खान दौरान आदि मोगल सरदारांचा पराजय केला (फेब्रुवारी १७३५ ). तोच प्रकार वजीर कमरुद्दीन याचा झाला. याच्या वरील मोहिमेत पिलाजी जाधव राणोजी भोसले, व्यंकटराव घोरपडे इत्यादी सरदार होते. दोन मार्च १७३५ चे पिलाजी जाधवाचे पत्र "वजीर वीस पंचवीस हजार फौजेनिशी दिल्लीहून आम्हावर आला...... त्यांची आमची दोन तीन युद्धे झाली. त्याची दोन तीनशे उंटे घोडी पाडाव आली. आम्ही निघोन सिप्री कुलारस प्रांते आलो. कमरुद्दीन पांच लक्ष देतात. आमचे मनोगत नाही. त्यासी आम्हासी बारा कोसांची तफावत आहे. पुढे आम्ही बुणगे घेऊन चांदे देवगड मुलुखातून देशास येऊ. " (पेशवे दप्तर १४·२२ ).











पण निजामानें मराठ्यांची अडवणूक केली काय ? हें पत्र पाहा :

" राजश्री पिलाजी जाधव याचे लष्कर नवाबाचे लष्कर जवळी उतरले. काही संदेह कोन्हे विषई नवता. सुखरूप घाट चढून गेले. परस्परे पत्रे आली, उत्तरे गेली. संतोश जाला." ( पेशवे दप्तर खंड तीस क्रमांक १२५ पान ६५ तारीख सव्वीस मे १७३५ ) इ. स. १७३५ मधे निजामाने पुन्हा कर्नाटकात मोहीम काढली. कर्नाटकांतील बंकापूर, कडपा, कर्नूल, येथील पठाण सरदार यांच्यावर दबाव घालणे, सोंधे बिदनूर श्रीरंगपट्टण येथील संस्थानिकांकडून खंडणी घेणे ही कामे त्याने केली "कर्नाटकचे कुल पठाण दहाबारा हजार स्वार येऊन भेटले व उदाजी चव्हान ती चौ. हजार स्वारानसी येऊन भेटला ... ... बिदनुराकडे जात होते ते मावकूफ ( रहित ) करून बमये पठाण वगैरे कृष्णातीराने तिकडे येतात." ( पेशवे दप्तर खंड १०, क्रमांक ८४ पान ७९ ).

मराठयांच्या उत्तरेतील आक्रमणाबाबत मूग गिळून बसणारा निजाम दक्षिणेत मराठ्यांचा उपसर्ग आपल्याला शक्य तितका कमी लागावा याची धडपड करताना दिसतो. मराठ्यांना अडविणे तर त्याला जमत नव्हते. पण कारस्थाने मात्र तो सतत करी. मराठे सरदारांना फोडून आपल्याकडे आणणे हा तर त्याचा सततचा चाळा होता. निजामापाशी संपत्ति, साधने बरीच होती. त्यामुळे पुष्कळसे मराठे सरदार त्याच्याकडे ओढले गेले. राव रंभा निंबाळकर, चंद्रसेन जाधव, चिमणाजी दामोदर मोघे, सुल्तानजी निंबाळकर हे इ. स. १७१३ ते १७३० मध्ये त्याच्याकडे गेले होते. कान्होजी भोसल्याला त्याने आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केला. पण रघोजीने त्याला कैद करून साताऱ्याकडे पाठविले. दाभाड्यांशी केलेली कारस्थाने त्याच्या अंगाशी आली. उदाजी पवार हाही काही दिवस निजामाकडे आला. उदाजी चव्हाणालाही त्याने जहागिरीची आशा लावली. जंजिऱ्याच्या हबशांबरोबरही त्याची कारस्थाने चालू असत. त्यांनी पाच डिसेंबर १७३५ रोजी बाणकोट घेतला तर याला मोठा आनंद झाला. पुढे पिलाजी जाधवाने लागलीच बाणकोट सर केला आणि चिमणाजी अप्पाने चराईच्या लढाईत सिद्दी साताला ठार मारले ( एकोणीस एप्रिल १७३६ ). आणि हबशांच्या ताब्यातील कुलाबा जिल्हा काढून त्याला फक्त तीनशे चौरस मैलाच्या प्रदेशात कोंडून ठेवले. तेव्हां त्या दिशेने चाललेले निजामाचे चाळे बंद पडले.

रघोजी भोसल्याने वऱ्हाडात ठाण मांडून चापून चौथाई वसूल करण्याचा सपाटा चालविला. निजामाला तो आवरेना तेव्हां त्याला गप्प बसणे भाग पडले.

" राजश्री रघूजी भोसले शंभर दोनशे राउतानिसी कुरे मांगरुल त्या प्रांतीच फिरत आहेत. त्याचे मोकासे कमावीस....चालत आहे. आडताला नाही. नवाब आता त्याचे वाटे जात नाही. " ( पेशवे दप्तर खंड ३० क्रमांक १२५ पान ९६, सव्वीस मे १७३५ )

मराठयांनी याच वर्षी कर्नाळ्याचा किल्ला हबशांकडून घेतला. कल्याण-भिवंडी प्रांतांतील माहुलीचा किल्लाही याचवेळी त्यांच्या ताब्यात आला. जुन्नर हातचा जातो की काय अशी निजामाला भीति वाटली. जुन्नरचा किल्लेदार अब्दुल अजीज ऊर्फ मकबूल आलम हा घाबरला. निजामाने त्याच्याकडे सैन्याची मदत पाठवून त्याचे समाधान केले. सारांश मराठे आपले हक्क चापून वसूल करीत. निजामाला ते असह्य होई, पण बाजीरावाच्या वाढत्या पराक्रमापुढे त्याला काही करणे शक्य होत नसे. असलेला मुलुख आपल्या हातचा जाऊ नये याबद्दल तो अतिशय जागरुक असे.

इ. स. १७३५ च्या सुरवातीला निजाम कर्नाटकच्या मोहिमेवरून बऱ्हाणपुरास आला. माळव्यातील मोगल-मराठा संघर्ष निकालात निघून मोगल सेनापति दिल्लीस परत गेल्यावर तो हैदराबादेस गेला. या वर्षाच्या हिवाळ्यात त्याचा मेहुणा सय्यद जमालखान याने औरंगाबादेस बंड केल्याचे कळल्यावर तो एकोणीस नोव्हेंबर १७३५ ला औरंगाबादेस परत आला. तेथे त्याने जमालखानाची समजूत घातली. आणि तो फिरून कर्नाटकाच्या मोहिमेवर रवाना झाला. पुढे इ. स. १७४० मधे निजामुल्मुल्काचा मुलगा नासिरजंग याने बापाविरुद्ध बंड केले त्यात जुन्नरचा अब्दुल अजीज, सय्यद जमालखान इत्यादि सरदार हे नासिरजंगाला मिळाले होते हे लक्षात ठेवले पाहिजे.

इ. स. १७३५ च्या आक्टोबरमधे बाजीरावाने उत्तरेकडे कूच केले. माळवा राजस्थान इत्यादि प्रांतां-










तून यशस्वी मोहिमा करून तो चोविस जून १७३६ रोजी पुण्यास परत आला. या काळात निजामुल्मुल्क कर्नाटकात होता.

"रा. रावही (बाजीराव) त्या प्रांते (उत्तरेत) जाणार ऐकिले आहे. चित्तांत घाबिरे आहेत. बाहीर धिटाई करून संपादनी करून आहेत. काही विचार यासी सुचत नाही." (पेशवे दप्तर खंड १०, क्रमांक ९२ पान ८५ तारीख तेवीस नोव्हेंबर १७३५)

याच खंडातील पत्र क्रमांक ९४, सात जानेवारी १७३६ चे पत्र :

"तीर्थस्वरूप स्वामी बुंदीकोटा तिकडे गेले. माळव्यात भला आमल नकश केला. नवाबास वर्तमान आले."

इ. स. १७३५ च्या डिसेंबर महिन्यात निजामाचे दोन विश्वासू अधिकारी वारले; एक गयासखान आणि दुसरा औरंगाबादेचा कोतवाल हाजी महंमद अलीखान.

या मोहिमेत निजाम सोंधे बिदनूरपर्यंत गेला. तेथे त्याने पठाण सरदार आणि सोंधे बिदनूरचे संस्थानिक यांचा बंदोबस्त केला.

**१७३६**

एप्रिल १७३६ मधे तो कर्नाटकातून परत फिरला. "निजामनमुल्क माघारे फिरले. बीड प्रांतामधे शंभुसिंग जाधवराव व सरलष्कराकडील फौज व गोरखोजी भापकर या त्रिवर्गानी मुलुकामधे धामधूम केली. म्हणून राजश्री सुल्तानजी निंबाळकर यांनी आपली फौज पुढे पाठविली आहे व राजश्री जानोजी निंबाळकर यानीही आपली फौज आपल्या देशामधे पाठविली आहे" (पेशवे दप्तर खंड १० पत्र क्रमांक ९७ पान ९१ तारीख सात एप्रिल १७३६)

औरंगाबादेचा सुभेदार सय्यद लष्करखान याचा बीड प्रांतामधे शंभुसिंग जाधव, भापकर वगैरेंशी जो युद्धप्रसंग आला त्याचे तपशीलवार वर्णन सय्यद-लष्करखानाचा अधिकारी आणि अहवाले खवाकीन या निजामुल्मुल्काच्या चरित्राचा लेखक महंमद कासीम याने केले आहे. निजामुल्मुल्क हा हैदराबादेवरून बुऱ्हाणपुरास आला. त्याच्या पूर्वीच बाजीराव हा आपली उत्तरेकडील मोहीम आटोपून पुण्याकडे परतला होता. (जून १७३६) या वेळची एक घटना महंमद कासीमने दिली आहे. तो म्हणतो : "या सुमारास बाजीराव हा उत्तरेतून परत फिरला होता. त्याचा उपसर्ग आपल्याला होईल या कल्पनेने सय्यद लष्करखानाने बाजीरावाचा प्रतिकार करण्याची तयारी केली. ... बाजीराव हा पुण्याकडे जाण्याच्या घाईत होता. त्यामुळे कोणत्याच प्रकारचा युद्धप्रसंग उद्भवला नाही. याशिवाय यावेळी निजामुल्मुल्काच्या मनात बाजीरावाशी लढण्याचे नव्हते. निजामुल्मुल्क हा मराठयांचा पाडाव करू इच्छीत नव्हता असे नाही पण परमेश्वरी इच्छेपुढे कुणाचे काय चालणार ! मराठयांचा प्रश्न सुरवातीपासून आटोक्याबाहेर गेला होता. ... ... निजामुल्मुल्काला माहीत होते की मोगल दरबारात आपल्याला विरोध करणारे पुष्कळ आहेत आणि हा विरोध ते बादशहाच्या आज्ञेने करीत आहेत म्हणून त्याने मराठयांच्या बरोबर आपले सलोख्याचे संबंध दृढ केले. सय्यद हुसेन अलीखानाने ठरवून दिल्याप्रमाणे त्याने मराठयांना चौथाई देण्याचे कबूल केले ... आता मराठयांना डावलणे कठीण होऊन बसले आहे. हे संकट मोगलांनी आपसातल्या मतभेदामुळे आपल्यावर ओढवून घेतले आहे. यापुढे परमेश्वराच्या मर्जीला काय येईल ते पहावे." (अहवाले खवाकीन).

निजामाला खरी काळजी होती ती आपला दक्षिणचा सुभा सलग राखण्याची. मराठयांची धामधूम चौथाईच्या निमित्ताने दक्षिणभर चालू होती तिच्यामुळे तो त्रस्त होता. त्यापेक्षा अधिक मराठयांनी मागू नये याबद्दल तो किती जागरुक होता याचे एकच उदाहरण पहा. वेरुळची (औरंगाबादेजवळ) पाटीलकी शाहू महाराजांची–

"राजश्री स्वामींनी नवाबास पत्रे लिहिली होती. तेथे वकिलाचे व त्याचे जाबसाल झाले की आजि तुम्हास येरुळची पाटीलकी दिल्ही म्हणजे पुढे दौलताबादही आमचीच आहे तेहि घ्याल म्हणाल ते आपणाच्याने कैसी देवल्ये ! ऐशा बोल्या जाहाल्या." (पेशवे दप्तर खंड ३० पत्र क्रमांक १६६ पान १३१ तारीख अठरा मे १७३६ ).

इ. स. १७३६ च्या नोव्हेंबरमध्ये बाजीरावाने पुन्हा उत्तरेकडे कूच केले. या स्वारीतच बाजीरावाने दिल्लीवर धडक मारली (अठ्ठावीस मार्च १७३७) मोगल सरदार मथुरेस एकत्र झाले होते त्याची या बातमीने








तारांबळ उडाली. पण बाजीराव उत्तरेकडे जात असता निजाम स्वस्थ बसून होता. दिल्ली दरबारने अमके करावे तमके करावे. मोगलांनी मराठ्यांना उत्तरेकडून रेटीत नर्मदेपर्यंत आणावे म्हणजे मी दक्षिणेकडून वर येईन आणि मग आपण सर्वांनी मिळून मराठ्यांचा धुव्वा उडविणे सोपे जाईल अशा प्रकारचे कागदी घोडे तो नाचवीत होता आणि मीच तेवढा खपत आहे. बाकी कोणीच काही करीत नाही अशी तक्रार करीत होता. नोव्हेंबर १७३६ मधे बाजीराव उत्तरेत गेला तेव्हा निजाम औरंगाबादेस होता. पण त्याला अडविले नाही.

१७३७

शेवटी दिल्ली दरबाराची तातडीची पत्रे येऊ लागली तसे निजामाने दिल्लीकडे जाण्याचे ठरविले. सतरा एप्रिल १७३७ रोजी त्याने बुऱ्हाणपुर सोडले. आपला मुलगा नासिरजंग यास त्याने औरंगाबादेस ठेवले. या सुमारास बाजीराव दिल्लीहून परत येत होता. त्याचा सरदार पिलाजी जाधव हा निजामास भेटला. बाजीरावाचे प्रस्थ दिल्ली दरबारात वाढू नये आणि त्याच्या वर्चस्वाची झळ आपल्या दक्षिणेतील सुभ्यास लागू नये याबद्दल त्याला काळजी लागली होती. दिल्लीस गेल्यावर मराठ्यांविरुद्ध मोहीम काढण्याचे दिल्ली दरबारने ठरविले. निजामाला मराठ्यांचे उत्तरेतील वर्चस्व उडवून लावण्याची संधि सापडली. "दिल्लीचा मजकूर कीं निजामानी पातशहासी करार केला जे आपणास पांच सुभे देणे आणि करोड रुपये देणे म्हणजे आम्ही हरिभक्तास रेवापार होऊ देणार नाही आणि कदाचित फार शेली करतील तर दक्षिणची चौथही उठवून देऊ ऐसी बहुत प्रकारे वल्गना केली ती पत्री कोटवर लिहावी, ...... इकडे पुत्र गाजिउद्दीन याचे नावे अकबराबाद ( आग्रा ), व माळवा दोन सुभे करार करून ( ३ आगष्ट १७३७ ) शिरोपाव दिल्हा...... आता राहिले तीन सुभे, प्रयाग, गुजरात व अजमीर ते आपल्या भाउबंदांच्या नावे करून घेणार" ( पेशवे दप्तर १९-९३ ).

पण बाजीरावाने निजामाला भोपाळवर कोंडून ( तेरा डिसेंबर १७३७ ते सात जानेवारी १७३८ ) निजामाच्या महत्त्वाकांक्षा धुळीला मिळविल्या. माळवा, आग्रा, अजमीर, गुजरात इत्यादि सुभ्यांचे त्याचे स्वप्न विरून गेले. यानंतर निजामाने मराठ्यांच्या उत्तरेच्या राजकारणात पुन्हा कधीही ढवळाढवळ केली नाही.

उत्तर भारतातील निजामाचे समकालीन इतिहासकार निजामाला बंडखोर आणि साम्राज्यद्रोही समजतात. मराठ्यांशी त्याचे अंतस्थ सूत असल्याशिवाय मराठे उत्तरेकडे येणे शक्य नाही याबद्दल त्यांची खात्री आहे. निजामाचे पक्षपाती इतिहासकार ( महंमद कासीम इत्यादि ) निजामाने मराठ्यांशी स्नेहसंबंध दृढ केले हे कबूल करतात पण बादशहाने निजामाशी सतत विरोध केला म्हणून त्याला असे करणे भाग पडले असे सुचवितात.

पण इ. स. १९४८ पर्यंत हैदराबादेतील इतिहासकार ( यूसुफ हुसेनखान, जुनैदी ) हे निजामुल्मुल्काला राजद्रोही आणि बंडखोर मानण्यास तयार नव्हते. तो राजनिष्ठ होता आणि मराठ्यांशी सतत लढत राहिला असे ते सुचवितात.

पेशवे दप्तरातील वर दिलेल्या अनेक उताऱ्यांवरून निजामुल्मुल्काच्या अंतरंगाची कल्पना येते. माझा दक्षिणचा सुभा सुरक्षित राहिला तर पुरे. मराठे माळवा गुजरात प्रांतावर आक्रमण करून गेले तर त्याना अडविणे हे माझे काम नाही. ते इतरांनी करावे अशी भूमिका त्याने घेतली. या धोरणामुळे मोगल दरबाराच्या नजरेत तो राजद्रोही ठरल्याशिवाय दीर्घ धोरण म्हणूनही निजामाला आपल्या उद्देशात यश आले नाही. उत्तरेत आक्रमणे करीत करीत मराठे म्हणजे एक भारतव्यापी शक्ति बनले. उलट निजाम हा एक प्रांतीय महत्वाचा संस्थानिक बनून निष्प्रभ आणि निष्क्रिय झाला. निजामुल्मुल्काच्या हयातीतच मराठ्यांनी वर्धेच्या पूर्वेकडील मुलुख, नर्मदेवरील खरगोणहंडिया, कोकणातील ठाणी, मिरज, चाकण ही स्थळे आपल्या ताब्यात आणली. त्याच्या मृत्यूनंतर अवघ्या बारा वर्षाच्या आत खानदेश, अहमदनगर, नाशिक, सोलापूर, धारवाड विजापूर, बेळगाव इत्यादि प्रांतावरून निजामाची सत्ता नाहीशी झाली. यावरून निजामुल्मुल्काने मोगल दरबाराशी स्वीकारलेले धोरण परिणामी किती आत्मघातकी ठरले याची कल्पना येईल.

---

डॉ. ग. ना. जोशी

# ' राजकारणाचे अध्यात्मीकरण '

## गोखल्यांचे जीवन हे राष्ट्रहिताचे साधन

नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांच्या जन्मशताब्दी-महोत्सवास नुकतीच सुरवात झाली आहे. भारताच्या पुनरुत्थानाच्या काळात जी महान नररत्ने निर्माण झाली त्यात कै. नामदार गोपाळ कृष्ण गोखले ह्यांचे स्थान बरेच वरचे आहे व ते अनन्यसामान्यही आहे. गोखले म्हटले तर राजकीय नेते होते व राजकारणी पुरुष होते. त्यांचे बरेचसे कार्य राजकीय क्षेत्रातच झाले आहे व इतके असूनही ते रूढ अर्थाने ' राजकारणी ' नव्हते. त्यांनी राजकारणात प्रामुख्याने भाग घेतला व मोलाचे कार्य केले; परंतु ते राजकारण खेळले मात्र नाहीत. राजकारण हे त्यांनी देशसेवेचे एक साधन मानले व त्याचा उपयोग देशाची व जनतेची सेवा करण्याच्या भावनेने केला. लोकमान्य टिळक, आगरकर, कर्वे ही ज्या तोलाची माणसे होती त्याच तोलाचे नामदार गोखले होते. दलित व पतित यांच्या दुःखीकष्टी जीवनात सुधारणा करण्यासाठी त्यांनी सतत चिंतन केले व त्यांच्या सर्वांगीण विकासासाठी, भरीव कार्य करण्यासाठी तत्परतेने अविरतपणे प्रयत्न केले. त्यांचे कार्य दिखाऊ, चटकन डोळ्यात भरणारे, दिपवून टाकणारे व प्रखर असे जरी नव्हते तरी ते अविरत चालू असे. त्यांचे कार्य सूर्याच्या प्रखर प्रकाशासारखे दीप्तिमान नसले तरी जमीनीत अज्ञातपणे जिरून झाडांच्या मुळांना पोषण पुरविणाऱ्या पाण्यासारखे होते. गोखल्यांनी आपले सर्व आयुष्य हे मिशनऱ्याच्या निष्ठेने काम करण्यात व दलितांवरील अन्याय व अत्याचार यांचे निराकरण करण्यात अत्यंत प्रामाणिकपणे, निरलसपणे व जिव्हाळ्याने व्यतीत केले. ते वृत्तीने शांत, गंभीर व सात्त्विक होते. राजकारणात काम करण्यामागे स्वार्थ साधणे, मोठेपणा, कीर्ति व संपत्ती संपादन करणे ही प्रेरणा त्यांच्या ठिकाणी यत्किंचितही नव्हती. राष्ट्रसेवा हे त्यांनी आपले जीवितकार्य मानले व रात्रंदिवस राष्ट्रहिताचा ध्यास घेऊन सदैव त्याच्याच चिंतनात ते मग्न असत. आपल्या आयुष्याचे मौल्यवान क्षण त्यांनी कधीच फुकट दवडले नाहीत. आपल्या आयुष्याचा कणकण व क्षणक्षण त्यांनी इतक्या काटेकोरपणे वापरला की भोजनोत्तर त्यांनी कधी वामकुक्षीही घेतली नाही.

### कार्य व वृत्ती

दक्षिण आफ्रिकेत भारतीयांवर जे अन्याय व जुलूम होत असत व त्यामुळे त्यांचे जे हाल होत असत त्यामुळे व्यथित होऊन स्वतः दक्षिण आफ्रिकेतील भारतीयांना भेटण्यासाठी व त्यांना दिलासा देण्यासाठी आणि त्यांच्यावरील आपत्तींचा परिहार करण्याच्या उद्देशाने तेथील भारतीयांना भेटावयास गेलेले गोखले हे पहिले भारतीय नेते होते. त्यांचा विलक्षण प्रभाव तेथील भारतीयांच्या मनावर कसा पडला होता तो त्यांना आफ्रिकेत जी असंख्य मानपत्रे देण्यात आली व ज्या उत्स्फूर्त भावनांनी त्यांचे तेथे सत्कार करण्यात आले त्यावरून स्पष्टपणे दिसते. गोखले हे मनाचे हळुवार व सात्त्विक मनोवृत्तीचे होते. महात्मा गांधींनी त्यांचे खरे मोठेपण ओळखले होते व त्यांनी गोखल्यांच्या चरणी जणू स्वतःस समर्पित केले होते. गोखले हे खऱ्या अर्थाने ' महामना ' किंवा 'महात्मा' होते. मात्र त्यांचे तेज शांत, प्रसन्न, जीवनप्रद व आल्हाददायक होते. त्यांनी सार्वजनिक कार्यात कधी आततायीपणा केला नाही. माणुसकीची, सभ्यतेची, शिष्टाचाराची व बुद्धिवादाची पातळी सोडून त्यांनी कधी कोणताच आचार केला नाही. परंतु त्यांची सात्त्विकता म्हणजे दुर्बलता किंवा नेभळटपणा नव्हता. त्यांची सभ्यता म्हणजे लाचारी किंवा शरणागती नव्हती. त्यांची सुशील व सुसंस्कृत वागणूक सामर्थ्यहीन नव्हती. गोखले तसे वृत्तीने खंबीर, कणखर, झुंजार व तत्त्वनिष्ठ होते. त्यांनी तत्त्वाच्या बाबतीत कधी तडजोड स्वीकारली नाही. मात्र हे सर्व करीत असताना प्रतिपक्षाशी ते उच्च भूमिकेवरूनच व्यवहार







करीत होते. अभ्यासपूर्ण व विवेकशील भाषणे करून व वस्तुस्थितीचा भरपूर आधार घेऊन गोखले आपले मुद्दे सप्रमाण ठासून मांडून खंबीर व निश्चित भूमिका घेत. ब्रिटिशांना ते आपल्या अभ्यासपूर्ण व साधार व्याख्यानांनी नामोहरम करून वैज्ञानिक भूमिकेवरून सरकारी घोरणातील दोष दाखवून आपल्या विधायक सूचना जोरदारपणे मांडत. ते धैर्यशाली व झुंजार पुरुष होते; परंतु त्यांची सेवेची पद्धती ही काहीशी संसदीय Parliamentary स्वरूपाची होती. प्रखर बुद्धिप्रधानता, विवेचकता, तर्कशुद्धता व युक्तिवादातील कौशल्य हे त्यांचे गुण प्रतिपक्षालाही मान्य करावे लागत. ते चळवळ्या राजकारणाचे प्रणेते व पुरस्कर्ते नव्हते; परंतु ते बुद्धिवादी, शास्त्रशुद्ध व विधायक राजकारणाचे एक धुरंधर व अनन्यसामान्य नेते होते हे सर्वमान्य सत्य आहे. ते अधिक काळ जगते तर देशाला त्यांच्या सेवेचा अधिकच लाभ मिळाला असता. त्यांनी प्रकृतीची काळजी न करता अविरतपणे परिश्रम करून आपले प्राण भारतमातेच्या चरणी वाहिले. ह्या महापुरुषाच्या निर्वाणानंतर त्यांचे शिष्य म्हणवणारे महात्मा गांधी हे भारतीय राजकारणाच्या क्षितिजावर उगवले व गोखल्यांचे जीवन व कार्य यापासून महात्मा गांधींनी स्फूर्ती घेऊन त्यांच्या सोज्वळ, सात्त्विक, प्रसन्न व निर्द्वेष जीवनाचा व विधायक कार्याचा वारसा पुढे चालू ठेवला. गोखल्यांची प्रेरणा व वृत्ती यांची जपणूक करून ती आपल्या हयातीभर वाढीस लावण्यासाठी गांधीजीनी मनोभावे प्रयत्न केले. गोखल्यांचे काम प्रामुख्याने बुद्धिवादी व संसदीय स्वरूपाचे होते. जनतासंघटन त्याना कधी जमले नाही. गांधीजीनी मात्र गोखल्यांचे मूळचे कार्यक्षेत्र व्यापक बनविले, कार्याचा विस्तार वाढविला व विविधकार्ये सुरू करून विधायक कार्ये अधिक प्रभावीपणे चालविली व असंख्य तरुण व बुद्धिवादी माणसे विधायक कार्याकडे आकर्षून घेऊन समाजसेवेची असंख्य क्षेत्रे उघडून समाजाच्या सर्वांगीण उन्नतीसाठी प्रयत्न केले. महात्मा गांधी जनतेचे संसदीय नेते नव्हते. कायदेमंडळातून सुधारणा घडवून आणण्याचे कार्य त्यांनी कमी महत्त्वाचे मानले नाही; तथापि बाहेरूनही लोकांची मने कार्यशील व प्रयत्नशील बनवून त्यांना स्वावलंबी बनविणे, त्यांच्या ठिकाणी जागृती निर्माण करून लोकांना समाजनिष्ठ बनविण्यासाठी व समाजोन्नतीसाठी प्रत्येक व्यक्तीने सच्चरित होऊन निःस्वार्थपणे समाजसेवा करण्यासाठी मोठ्या प्रमाणावर प्रेरणा समाजात निर्माण केल्या. गांधीजी हे चळवळे राजकारण करणारे नेते होते हे खरे; परंतु त्याचबरोबर प्रचंड सामुदायिक आंदोलनात लोकांनी शुद्ध, नैतिक व सदाचारी प्रवृत्ती सोडता कामा नये असाही आग्रह ते धरीत. गोखल्यांचे ' भारत सेवकसमाज ' ( हल्लींचा हिंद सेवासंघ ) स्थापन करण्याच्या मागे जे ध्येय होते तेच ध्येय समोर ठेवून गांधीजींनी देशात बुद्धिमान्, सुसंस्कारी सात्त्विक व सभ्य वृत्ती लोकांच्यापुढे ठेवून विधायक कार्ये करण्याचे शिक्षण व प्रेरणा लोकांना दिल्या. गोखल्यांचे कार्य केवळ राजकीय नव्हते तर ते व्यापक सामाजिक स्वरूपाचे होते, व ते उच्चनीतीच्या आदर्शावर आधारलेले असे संपन्न राष्ट्रीयचारित्र्य घडविणारे होते.

यातून एक अतिशय महत्त्वाचा जिव्हाळ्याचा व शाश्वत स्वरूपाचा असा प्रश्न निर्माण होतो व तो असा की राजकारण हे विधायक वृत्तीचे, प्रामाणिकपणे व नैतिक सद्गुणावर आधारून करता येते का ? तसे करणे शक्य व इष्ट आहे का.

## नैतिक मूल्यांवर आधारलेले राजकारण

राजकारण धरून कोणतेही सार्वजनिक कार्य हे नैतिक दृष्ट्या शुद्ध, सोज्वळ, प्रामाणिक व सात्त्विक वृत्तीने केले पाहिजे; वैयक्तिक जीवनात व व्यवहारात आपण जसे सभ्यतेचे, शिष्टाचाराचे नियम पाळतो व सद्गुणांचे पालन करतो तसेच आपण सार्वजनिक व राजकीय जीवनात वागले पाहिजे व नैतिक पावित्र्य कटाक्षाने सांभाळले पाहिजे असे गोखल्यांनी प्रतिपादिले. महात्मा गांधींनी त्यांची शिकवण मौल्यवान समजून राजकारणात नीतीला बरचे स्थान देऊन राजकारण हे नीतीवर आधारण्याचे प्रचंड प्रयत्न केले आणि पंडित जवाहरलाल नेहरूंनी केवळ देशाच्या अंतर्गत कारभारातच नव्हे तर आंतरराष्ट्रीय राजकारणातही गोखले–गांधी ह्यांची ही शिकवण व्यापक क्षेत्रात आचरण्याचे प्रयत्न ' पंचशीलाच्या ' तत्त्वामार्फत केले. गोखले–गांधी–नेहरू ह्यांचे हे प्रयत्न अपेक्षेप्रमाणे यशस्वी व फलदायी ठरू शकले नाहीत असे म्हणणारे बरेच लोक

-आहेत व त्यांनी तसे म्हणण्यात तथ्यही आहे. तथापि राजकारणाला नीतीचे अधिष्ठान देणे किंवा राजकारणाचे अध्यात्मीकरण करणे ही गोष्ट अनिष्ट आहे असे कोणीही बुद्धिवादी मनुष्य म्हणत नाही. राजकारण हे आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनात इतके ओतप्रोत भरले आहे व त्याने आपले संपूर्ण जीवन इतके व्यापून टाकले आहे की राजकारणापासून मग ते प्रत्यक्ष असो की अप्रत्यक्ष असो- अलिप्त राहता येत नाही. राजकारणात भाग घेण्याची अनेकांची इच्छा नसते; परंतु त्याचे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष परिणाम मात्र प्रत्येकास अनुभवावेच लागतात. ते टाळता येत नाहीत व म्हणून व्यक्तीस राजकारणापासून पूर्णपणे अलिप्त होताच येत नाही. राजकारण हे आता इतके सर्वव्यापी बनले आहे की समाजातील बारीक सारीक ज्या काही संघटना, मंडळे, समित्या व संस्था असतात त्यात कमी अधिक प्रमाणात राजकारण चालूच असते व ते करावे लागते म्हणून काही मंडळी खेळतातही. एकूण राजकारणापासून कोणासही अलिप्त राहता येत नाही व त्याची अपेक्षाही करून चालत नाही.

## जागतिक ऐक्यामुळे राजकारणाचे बदललेले स्वरूप

वाफ, वीज व अणुशक्ती यावर अत्यंत जलद धावणारी व प्रचंड कार्य करणारी वाहने व यंत्रे, परस्परांशी विनिमय करण्याची रेडिओ, टेलिव्हिजन, बिनतारी संदेशयंत्रे, टेलिप्रिंटर्स यासारखी प्रभावी उपकरणे व साधने निर्माण झाल्याने कोणाची इच्छा असो वा नसो जगातील सर्व भागातील लोक आता फारच जवळ आले आहेत. व्यापार व उद्योगधंदे यामुळे लोकांचे परस्पर हितसंबंध जोडले गेले आहेत व फार मोठ्या प्रमाणात राष्ट्राराष्ट्रांतील लोकांचे परस्परावलंबनही निर्माण झाले आहे. आता कोणताही गट, समाज वा राष्ट्र हे संपूर्णतः स्वावलंबी व स्वयंपूर्ण राहिलेले नाही. व राहू शकत नाही. सध्या परस्परावलंबनाचे अत्यंत गुंतागुंतीचे जाळे बनले आहे व म्हणून 'एक जगत्' ही आता केवळ एक कल्पना राहिलेली नाही, तर ती दररोज प्रतिक्षणी अनुभवायला मिळणारी अशी कठोर वस्तुस्थिति बनलेली आहे. देशातील व जगातील सर्व लोक अशा प्रकारे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मार्गांनी जर परस्परावलंबी व परस्परपूरक बनून 'इच्छेने' व 'अनिच्छेने' एक बनले आहेत व हे ऐक्य प्रत्येक व्यक्तीवर जर अपरिहार्य म्हणून बंधनकारक बनले आहे तर ते व्यवस्थितपणे टिकविणे व त्याची जोपासना करणे हेही अत्यावश्यक व अटळ झाले आहे; आणि जे अटळ आहे, जे नाकारता व म्हटले तरी टाळता येत नाही व जे टाळल्याने अधिकच उग्र व गंभीर अनिष्ट परिणाम होणार असतील ते टाळण्यात व नाकारण्यात अर्थ नाही. किंबहुना ऐक्य टाळण्याचे असे काही प्रयत्न करणे हे शहाणपणाचेही ठरणार नाही. प्रत्येक राष्ट्रातील व जगातील लोकांनी एकत्वाची भावना अनुभवणे व ती प्रांजलपणे अनुभवता येणे हे आज परिस्थितीने अत्यावश्यक व जवळजवळ सक्तीचे केले आहे असे म्हणावयास हरकत नाही.

सर्व जग एक झालेच आहे. परंतु त्याचे एकत्व ही भौतिक घटना न राहता ती खऱ्या अर्थाने मानसिक अनुभूती बनावयास पाहिजे. म्हणजे बाह्य भौतिक साधनांनी जगातील व राष्ट्रातील लोक एकमेकांशी जोडले जात असले तरी केवळ तेवढ्याने 'एक जगत्' होऊ शकत नाही. जगातील एकता टिकावयाची असेल तर लोकांच्या मनोवृत्तीत बदल व्हावयास पाहिजे. सर्व धर्म, सर्व जमाती, सर्व वर्ण, सर्व वंश व सर्व भाषा यांच्या भेदांच्या पलीकडे जाता आले, सर्व मानव हा एक सारखा आहे. या भावनेने व समानतेच्या पातळीवरून सर्वांना परस्पराशी जर व्यवहार करता आले, परस्पराविषयी आदर दाखवून परस्परांचे स्वातंत्र्य टिकविता व सांभाळता आले तर व्यक्तींना आपापल्या व्यक्तिमत्त्वाच्या स्वतंत्र विकासाचे ध्येय आचरणात आणता येऊ शकेल. म्हणजे 'एक जगत्' ही केवळ भौतिक, वैज्ञानिक व व्यापारी घटकांवर अवलंबून असणारी गोष्ट राहात नाही; तर ती एक मानसशास्त्रीय, नैतिक व एका अर्थाने आध्यात्मिक गरज व घटना आहे, ही गोष्ट नाकारता येणार नाही. म्हणजे मानवाच्या सर्व व्यवहारांचे केवळ नैतिकीकरणच नव्हे तर अध्यात्मीकरण करणे हे आता अपरिहार्य व अत्यावश्यक बनले आहे ही गोष्ट सूक्ष्म विचाराअंती पटण्यासारखी आहे.



अनुक्रमणिका

## राजकारण व लोकशाही

राजकारण व अध्यात्म, त्यांचे स्वतःचे स्वतंत्र स्वरूप व त्यांचा परस्परसंबंध ह्या गोष्टी आता फारच महत्वाच्या बनल्या आहेत हे नाकारण्यात अर्थ नाही. भारतात व जगातील अनेक राष्ट्रात ' लोकशाही ' प्रकाराचा स्वीकार करण्यात आला आहे; व लोकशाही पद्धती जर खऱ्या अर्थाने साकार होऊन आचारात यावयाची असेल तर ' राजकारण ' या प्रकाराचा अर्थही आता बदलला आहे हे लक्षात घ्यावयास पाहिजे. पूर्वी ' राजकारण ' ह्याचा अर्थ विशिष्ट व मर्यादित बनलेला होता. आता नव्या परिस्थितीप्रमाणे ' राजकारण ' ह्याचा अर्थ, त्याचे स्वरूप व त्याचे कार्य हे सर्वच बदलले आहे व बदलत आहे. पूर्वी राज्यसंस्थेचे व राजकारणाचे मुख्य कार्य हे देशात अंतर्गत शांतता, सुव्यवस्था राखणे व कायद्याचे पालन करवणे व शत्रूच्या आक्रमणापासून जनतेचे संरक्षण करणे हे होते. पूर्वीचे राजकारण हे बहुतांशी राजे व त्यांचे सल्लागार करीत व त्यात बरीचशी वैयक्तिकता असे. राजांच्या स्वतःच्या महत्त्वाकांक्षा, वृत्ती, पूर्वग्रह, वैयक्तिक हेवेदावे या गोष्टींना अनुसरून देशातील अंतर्गत कारभार व इतर राष्ट्रांशी त्यांचे संबंध ठरत असत. शिवाय राजाच्या ठिकाणी अप्रतिबंध सत्ता असे व तो स्वतःला जनतेचा प्रतिनिधी व जनतेच्या सामर्थ्याचा निधिधारक न समजता परमेश्वर-नियुक्त मानत असे व त्यामुळे तो स्वतःच्या मनाप्रमाणे व लहरीप्रमाणे करील ती पूर्वदिशा ठरे. आणि म्हणून त्यावेळचे राजकारण हे हल्लींच्या लोकसमाजाच्या व लोकशाहीच्या राजकारणाहून फारच भिन्न प्रकृतीचे असे. इतिहासकालात राजकारणात शासित जनतेच्या मतांना काही स्थान नसे व लोकांच्या आशाआकांक्षा राजेरजवाडयांच्या राजकीय विचारात व कृत्यात व्यक्त व प्रतिबिंबित होत नसत. पूर्वीचे राजकारण बरेचसे राजघराण्यांच्या पारंपरिक वैरांनी व्यापलेले असे. त्यात लोकांना त्यांच्या इच्छेविरुद्ध खेचण्यात येत असे, व त्यात त्यांचे नाहक नुकसान होत असे. शासित जनतेचे हिताहित ह्या गोष्टीला फारसे महत्त्व प्राचीन कालातील राजकारणात दिले जात नसे. आता औद्योगीकरणानंतरच्या कालात व लोकमतानुवर्ती शासनसंस्थांच्या व्यवहारात राजकारणाचा अर्थ, कार्य व स्वरूप पूर्णपणे बदलले आहे. आताचे राजकारण संपूर्ण शासित समाजाच्या हिताभिमुखी बनले आहे. आता राष्ट्राराष्ट्रातील संघर्ष हे राजांच्या घराण्यांच्या परंपरागत पूर्वग्रहावरून, वैमनस्यावरून व वैरावरून न ठरता ते संबंधित राष्ट्रातील जनतेच्या हिताच्या संदर्भात ठरविले जातात. म्हणजे राष्ट्राराष्ट्रातील संबंध हे आता त्या राष्ट्रातील लोक ठरवितात व ते परस्परांच्या हितांच्या संदर्भात हे संबंध नक्की करतात.

## राजकारणाच्या आध्यात्मिकीकरणाची आवश्यकता

पूर्वीच्या राजकारणात केवळ थोडयाच व्यक्ती राजकीयसंबंधांचे स्वरूप ठरवीत असत व लोकांच्या भवितव्याची संपूर्ण जबाबदारी केवळ राजे व त्यांचे सल्लागार यांच्यावर असे. याउलट आता राष्ट्राचे हित वा अहित राष्ट्रातील संपूर्ण जनता काही वेळा स्वतः व काही वेळा अप्रत्यक्षपणे आपल्या प्रतिनिधींच्या मार्फत ठरविते. म्हणजे राष्ट्रातील विविध थरातील लोकांचे ऐक्य व राष्ट्राराष्ट्रातील जनतेचे निकोप संबंध हे आता लोकांच्या मनोवृत्तीवर व त्यांच्या ध्येयावर अवलंबून आहेत. आंतरराष्ट्रीय क्षेत्रात राष्ट्राराष्ट्रातील संबंध त्यांच्या संबंधांचे न्याय्यत्व काही आंतरराष्ट्रीय न्यायतत्त्वांच्या अनुरोधाने ठरविण्यासाठी आता 'आंतरराष्ट्रीय न्यायालय ' सुद्धा प्रस्थापित झाले आहे. तेव्हा निष्कारण युद्धे करणे व जागतिक जनतेला काही व्यक्तींच्या खाजगी हेव्यादाव्यासाठी किंवा महत्त्वाकांक्षांची तृप्ती करण्यासाठी युद्धात खेचणे या गोष्टी सहज व सोप्या राहिल्या नाहीत. राष्ट्रांच्या अंतर्गत व आंतरराष्ट्रीय व्यवहारांचे संकेत ठरविण्यात आले आहेत व ते स्थूलमानाने जगन्मान्य झाले आहेत. जगातील सर्वच लोक समान मानले जात आहेत. म्हणजे वंश, वर्ण, धर्म, भाषा, राष्ट्र आणि वैज्ञानिक व सांस्कृतिक प्रगती यांच्या भेदांच्या पलीकडे जाऊन अखिल मानवजात ही एक आहे व सर्व माणसे ही जन्माने व मुळात समान आहेत ही गोष्ट सर्वमान्य झालेली आहे. **'जाने न कस्माद् गुणवत् विरोधः ।'** हे तत्त्व मान्य झालेले आहे व म्हणून अगदी वस्तुनिष्ठ दृष्टीने विचार केला तरी संपूर्ण परिस्थिती, प्रवृत्ती व दृष्टिकोन बदलल्याने राजकारण हे आता केवळ सत्ताधिष्ठित, डावपेचांचे, कुटिल मार्गांचा अवलंब करून प्रतिपक्षाचा पाडाव







करण्याचे व अनुचित मार्गाने सत्तासंपादन करून ती वाममार्गांनी टिकवून धरण्याचे तंत्र राहिलेले नाही. राजकारण नव्या काळात आदर्शक (normative) बनले आहे. आताच्या राजकारणाला व राजकीय धोरणांना निश्चित ध्येय व गन्तव्य आहे आणि राजकारण हे त्या ध्येयांच्या प्राप्तीसाठी केवळ एक साधन म्हणून मानले जाते. सत्तेशिवाय राजकारण करता येत नाही ही गोष्ट सर्वांना मान्य असूनही आता 'सत्तेकरिता सत्ता मिळविणे' हे चांगले ध्येय समजले जात नाही. सत्ता ही अधिक मोठे ध्येय प्राप्त करून घेण्यासाठी एक साधन मानले जाते व ते ध्येय ठरविण्याची गमके ही स्वरूपाने नैतिक असतात. "आणि म्हणून राजकारणाचे स्वरूपच मुळात असे असते की त्यात सत्ता प्राप्त करून घेण्यासाठी, प्रतिपक्षावर सरशी करण्यासाठी आपण कोणती साधने वापरतो– शुद्ध की अशुद्ध, चांगली की वाईट– ह्याचा फारसा विधिनिषेध राजकारणात मानावयाचा नसतो, प्रेमाप्रमाणे राजकारणातही सर्व क्षम्य असते, ध्येय हे साधनांचे समर्थन करते– ध्येय चांगले असल्यास ते प्राप्त करून घेण्यासाठी कोणतेही साधन वापरावयास हरकत नाही, राजकारणात नैतिक प्रश्न उपस्थित करता कामा नये, राजकारण हे गढूळ असायचेच, राजकारणात पवित्र, अपवित्र, शुद्ध, अशुद्ध, सर्व काही गरजेप्रमाणे, प्रसंगोपात्त व त्याच्या उपयुक्ततेप्रमाणे वापरावयाचे असते इत्यादि राजकारणासंबंधी जे बोलले जाते ते गैर आहे. यामुळे राजकारणाच्या खऱ्या स्वरूपासंबंधी दिशाभूल होते व अशी भूमिका घेतल्याने वाईट गोष्टींना अप्रत्यक्षपणे प्रोत्साहन मिळते. एवढेच नव्हे तर राजकारणात कुटिल कारस्थाने केलीच पाहिजेत, वाममार्गांचा अवलंब केलाच पाहिजे; अशुद्ध साधनांचा वापर केलाच पाहिजे; राजकारणात अशुद्ध साधनांचा वापर हा अपरिहार्य असतो व तसे केल्याशिवाय राजकारण यशस्वी होऊच शकत नाही" असाही ग्रह राजकारणात काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचा व त्यात नव्याने प्रवेश करणाऱ्यांचा होतो. जाणूनबुजून असा वैचारिक गोंधळ माजविल्याने राजकारणासारख्या प्रभावी साधनाचा दुरुपयोग केला जाऊन राजकारणाच्या नावाखाली अनैतिक प्रवृत्तींचा आचार करण्याची प्रवृत्ती वाढीस लागते व तिला सैद्धान्तिक बैठक दिली जाते.

राजकारणाचे अध्यात्मीकरण ह्याचा खरा अर्थ राजकीय व्यवहारात नैतिक दृष्ट्या शुद्ध साधनांचा व मार्गांचा अवलंब करणे. अध्यात्माचा अर्थ येथे नैतिकीकरण (moralisation) असाच घ्यावयाचा. कारण आध्यात्मिक अनुभूती ही प्रामुख्याने वैयक्तिक असते, व ती मोठ्या समूहाला येणे शक्य नसते. म्हणून बाह्य आचरण (Conduct) हे शुद्ध व पवित्र असले पाहिजे एवढाच मर्यादित अर्थ येथे अभिप्रेत आहे. नीति ही एका दृष्टीने वैयक्तिक असली तरी तिला एक सामाजिक संदर्भ असतो. व्यक्तीची मानसिक स्थिती जरी काहीही असली तरी निदान व्यक्तीव्यक्तीमधील वागणे हे सभ्य व शिष्टाचारास धरून असले तरच समाजात शांतता, सुव्यवस्था, परस्परविश्वास व त्यामुळे सहकार्य व सहिष्णुतेचे वातावरण राहू शकते. सामाजिक संबंधात जर नीती नसली तर समाजातील व्यवहार हे विस्कळित व परस्पर फसवणुकीचे होऊन समाजात ऐक्य व सहकार राहू शकणार नाही, व समाज विखंडित होण्याची भीती असते. ज्यावेळी गोखले सार्वजनिक जीवन हे शुद्ध, सभ्य, सुसंस्कृत व शिष्टाचाराधारित व्हावे असे म्हणतात त्यावेळी त्याचा अर्थ असा की सामाजिक व राजकीय व्यवहारात सत्ता, कीर्ती व संपत्ती मिळविण्यासाठी लोकांनी अनीतिमय मार्गाचा, फसवणुकीचा, दडपशाहीचा मार्ग अवलंबिता कामा नये. प्रामाणिकता परस्परविश्वास, दिलेले वचन पाळणे, परार्थपरता, सहिष्णुता हे सद्गुण असे आहेत की त्यांच्याच बळावर समाजात सुसंवादिता, सहकार व ऐक्य टिकू शकेल. खरे म्हणजे नीतिनियम असेच असतात की त्यांचा आधार असला व समाजात त्यांचा आचार होत राहिला तरच समाज शांततेने, सहकार्याने, एकीने व सुसंवादित्वाने आपले व्यवहार पार पाडू शकतो. ज्यावेळी नीतिनियमांचे उल्लंघन होते व नीतीविषयी अनादराची भावना वाढत जाऊन नीतीस लोक आव्हान देऊ लागतात तेव्हा समाजात संकर सुरू होतात व छकले होऊन तो भंग पावतो. त्यात अराजकता व गोंधळ माजू लागतो व त्याचा फायदा घेऊन काही महत्त्वाकांक्षी, सत्तापिपासू व स्वार्थी लोक समाजातील अस्थिर परिस्थितीचा फायदा घेऊन स्वतःच हुकूमशहा होऊन बसतात. म्हणून



अनुक्रमणिका






यशस्वी लोकशाही जीवन व राज्यपद्धतीसाठी नागरिकांच्या ठिकाणी उच्च प्रकारची नीतिमत्ता निर्माण व्हावयास पाहिजे व त्यांच्या आचरणात यावयास पाहिजे. नीती म्हणजे व्यक्तीवर किंवा समाजावर कृत्रिम रीतीने बाह्यतः लादलेली बंधने नसून ती व्यक्तीच्या व समाजाच्या निकोप, संतुलित व सुसंवादी जीवनास अत्यावश्यक व पायाभूत असे ते बंधनकारक नियम असतात व ते समाजाच्या पायातच अनिवार्य असे अन्तर्भूत घटक असतात. राजकारणाला नीतीचे अधिष्ठान अत्यावश्यक आहे असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा त्याचा अभिप्रेत अर्थच असा असतो की कोणतेही समाजकारण किंवा राजकारण निकोप व्हावयाचे असेल तर नैतिकमूल्याविषयी समाजाच्या घटकांनी आदर बाळगिला पाहिजे व तो वागण्यातून व्यक्त झाला पाहिजे.

आधुनिक काळातील राजकारण हे वर सांगितल्याप्रमाणे वैयक्तिक स्वरूपाचे केवळ राजेरजवाडे, सरंजामदार, जमीनदार यांचे वैयक्तिक, घराण्याचे किंवा गटाचे हित संरक्षणासाठी राहिले नसून ते समाजाच्या उद्धाराचे एक अत्यावश्यक असे साधन बनलेले आहे व ते करण्यात प्रौढ मतदानपद्धतीमुळे जवळपास संपूर्ण समाज, समाजातील प्रत्येक प्रौढ स्त्री व पुरुष यास काही वेळा प्रत्यक्ष व काही वेळा अप्रत्यक्षपणे भागीदार व्हावे लागते. आताचे राजकारण संपूर्ण समाजाचे बनलेले असल्याने त्यात व्यक्तींचे सहकार्य, परस्परविश्वास, परस्परांविषयी आदर या गोष्टी अपरिहार्यपणे अन्तर्भूत होतातच. त्या केवळ अभिप्रेत न राहता गृहीतच धराव्या लागतात. आणि म्हणून अशा संघटित राजकारणास, की ज्यात असंख्य व्यक्ती गुंतलेल्या असतात व सर्वांना परस्परांच्या मदतीने कार्य करावयाचे असते, नैतिक कर्तव्ये व बंधने पाळणे हे अपरिहार्य बनते.

हल्ली असे दिसते की काही चळवळी मंडळी ही सत्तापिपासू बनतात व आपली योग्यता नसताना, शैक्षणिक, सांस्कृतिक व नैतिक पात्रता नसताना केवळ आपली महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्याकरिता संधिसाधुपणाचे राजकारण करतात व मोठ्या पदांची कास धरून त्या जागा खटपटी करून मिळवितात. पैसा वाटणे, मानाच्या जागा देणे, व्यापारी सवलती मिळवून देणे, जातीयतेच्या भावनेस आवाहन करणे इत्यादि वाममार्गांचा अवलंब करून संधिसाधु व्यक्ती निवडणुकीत यशस्वी होतात व त्या आपल्या जागा स्वतःच्या व स्वतःच्या गटाच्या स्वार्थाकरिता वापरतात. यामुळे समाजात भ्रष्टाचार माजतो, वशिलेबाजीस ऊत येतो, अपात्र माणसे भलत्या (त्यांना अनुरूप नसतात अशा) जागा पटकावितात व त्या प्रकारच्या कार्याचे यथार्थ ज्ञान नसल्याने व व्यवहार कार्यक्षमरीतीने कसे चालवावयाचे हे त्यांना कळत नसल्याने ते संपूर्ण कार्याचा विचका करतात व त्यामुळे संपूर्ण समाजाचे अतिशय नुकसान होते. यात फार तर काही व्यक्ती स्वतःचा व त्यांच्या बारीकशा गटाचा सांपत्तिक फायदा करून घेतात. पण त्यात समाजाचे नुकसान होते. म्हणून योग्य ठिकाणी योग्य माणसाची त्यांचे ज्ञान, कुवत, कार्यक्षमता व अनुभव यांना अनुलक्षून नियुक्ती होणे ही गोष्ट समाजाच्या हिताच्या दृष्टीने आवश्यक आहे. समाजाचे व्यवहार नीट, शहाणपणाने व कार्यक्षमरीतीने चालावे असे वाटत असल्यास व्यक्तींची गुणवत्ता, पात्रता, शील व चारित्र्य यांचा विचार जरूर व्हावयास पाहिजे. अयोग्य व अपात्र माणसे वाटेल त्याठिकाणी जाऊन बसली, त्यांना अनुरूप नसलेले स्थान घेऊ लागली तर शेवटी त्यामुळे संपूर्ण समाजाच्या अकल्याणाशिवाय काय होणार ? म्हणून राजकारणासंबंधी पूर्वीचे बनलेले संकेत हे आता बदलावयास पाहिजेत व ज्या लोकशाही समाजरचनेत व राज्यव्यवस्थेत सर्वच व्यवहार लोकानी स्वतः चालवावयाचे असतात तिच्यात राजकारण हे अधिकच जबाबदारीच्या भावनेने करणे आवश्यक ठरते. ह्याचा अर्थ असा की ज्या व्यक्तीस जे काम करावयाचे असते त्या व्यक्तीस त्या प्रकारच्या कामाचे शास्त्रशुद्ध ज्ञान व अभ्यास असावयास पाहिजे, अनुभव पाहिजे, त्या प्रकारचे काम करण्यासाठी आवश्यक ते गुण व कुवत अंगी असावयास पाहिजे व कोणते का काम असेना ते नेकीने, शुद्ध मनाने, निष्ठेने व निःस्वार्थपणे करण्याची मानसिक वृत्ति व नैतिक शुद्धि तिच्याजवळ असली पाहिजे. असे जेव्हा घडत नाही तेव्हा समाजाची व त्याच्या कार्याची हानी होते.










हल्ली सामाजिक व राजकीय क्षेत्रात काम करणाऱ्यांच्या ठिकाणी नीतिमत्ता भ्रष्ट होत चालली आहे, ती फार जलद खालच्या पातळीवर जाऊ लागली आहे असे निरीक्षणावरून दिसते. ह्याचे कारण तरी काय आहे ? खरे म्हणजे निकोप सामाजिक जीवनासाठी नीती ही तर अत्यंत महत्त्वाची व पायाभूत अशी गोष्ट आहे. मग असे का ? आपल्या सामाजिक जीवनाच्या सर्वच क्षेत्रात नीतिमत्ता घसरगुंडीस लागली आहे व त्यामुळे आपल्या राष्ट्राची प्रगती मोठे प्रकल्प तयार करून उच्च आदर्श व ध्येये समोर ठेवूनही होत नाही असे दिसते. ह्या घटनेची कठोरपणाने मीमांसा करणे आवश्यक आहे. हे एक प्रकारचे शल्यकर्म आहे. परंतु हे वेळीच झाले पाहिजे. आजची अधोऽधो अवस्था जर अशीच चालू राहिली तर देश संकटाच्या व अवनतीच्या गर्तेत केव्हा कोसळेल हे सांगवत नाही.

## भ्रष्ट राजकारणाची मीमांसा

पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालयातील 'सॉक्रेटिक अ‍ॅसोसिएशन' नावाच्या तत्त्वज्ञानमंडळाच्या सुवर्णमहोत्सवाच्या निमित्ताने "राजकारणाचे अध्यात्मीकरण होऊ शकते का ?" या विषयावर एक महत्त्वपूर्ण परिसंवाद आयोजित करण्यात आला होता. त्या प्रसंगी काही विद्वान व अनुभवी विचारवंतांनी व कार्यकर्त्यांनी याविषयावर आपले विचार व्यक्त केले होते. त्यात बोलतांना कै. डॉ. र. पु. ऊर्फ अप्पासाहेब परांजपे यांनी व्यक्त केलेले विचार महत्त्वाचे आहेत. ते म्हणाले की, सध्या भारतातच नव्हे तर जगभर लोकसंख्या भरमसाट वाढत आहे. त्यासाठी त्यांनी Population explosion हा शब्दप्रयोग केला होता. त्यांच्या मते या असंख्य लोकांना शिक्षण व संस्कार ह्यांच्या मार्फत सभ्यता, सुजनता व सात्त्विकता ह्यांचे धडे देणे हे एक प्रचंड कार्य होऊन बसले आहे. हे कार्य करण्यासाठी म्हणजे शिक्षणसंस्थातून विद्यार्थ्यांना सुसंस्कारी करण्याचे कार्य करण्यासाठी आवश्यक व अनुकूल ती परिस्थिती उपलब्ध नाही. चांगल्या संस्कारांचे शिक्षक मिळणे व शिक्षणाविषयी त्यांना स्वतःला आस्था वाटून त्यामार्फत विद्यार्थ्यांच्या नव्या पिढीवर चांगले संस्कार घडविणे हे अत्यंत मौलिक व अत्यावश्यक कार्य आहे, यात शंका नाही. तथापी हे कार्य करण्यास अनुरूप अशी माणसे मिळणे कठीण होत चालले आहे. शिक्षणाच्या क्षेत्रात जी मंडळी येत आहेत त्यात काही शिक्षक व विद्यार्थी हे समाजातील अशिक्षित व असंस्कारित अशा थरातून येत आहेत आणि त्यांचेच संस्कार पुरेसे चांगले नसल्याने व त्यांना आपल्या कार्याचे महत्त्व नीट कळले नसल्याने व सुसंस्कार करण्याची पात्रता व कुवत त्यांच्या ठिकाणी नसल्याने शाळाकॉलेजातून चांगल्या संस्कारांनी प्रभावित झालेली अशी निकोपवृत्तीच्या विद्यार्थ्यांची नवी पिढी तयार होऊ शकत नाही. शिवाय जी काही सुसंस्कार करण्यास पात्र व उत्सुक अशी माणसे आहेत त्यांना पुरेसे वेतन व मानाने जगण्यासारखी परिस्थिती मिळत नाही. उलट व्यापार, उद्योगधंदे व राजकारण यातच शिक्षण कमी असलेली व चारित्र्यविहीन असलेली माणसे भरमसाट पैसा मिळवून समाजात सुखी जीवन जगतांना व पैशाच्या बळावर समाजातील व राजकारणातील मानाच्या व प्रतिष्ठेच्या जागा बळकावतांना दिसतात. या उलट जी नेकीची, नीतिसंपन्न चारित्र्याची, विद्वान्, अभ्यासू व निष्ठावंत माणसे असतात त्यांच्या आर्थिक हालांना पारावार राहात नाही व त्यांना समाजात प्रतिष्ठाही लाभत नाही, नालायक व दुर्गुणी माणसे प्रगत होताना पाहून आपल्या सद्गुणांचे चीज होत नाही, नीतिमत्ता आपल्या हालांना व दुःखांना कारणीभूत होते अशा प्रकारची जाणीव सद्गुणी व सुसंस्कारी लोकांना होत जाऊन त्यातून वैफल्याची भावना निर्माण होते व शेवटी अशी काही चांगल्या वृत्तीची माणसेही निराश बनतात; संशयीवृत्तीची बनतात व त्यामुळे ती आपल्या कामाविषयी उदास बनू लागतात. आणि ह्याचा परिणाम शेवटी जी चळवळी, खटपटी, लटपटी व भानगडी करणारी सामान्य बुद्धीची व कुवतीची पण डावपेच खेळण्यात व कपटकारस्थाने रचण्यात निपुण माणसे असतात त्यांची सरशी होण्यातच होतो. म्हणजे हे जणु एक दुष्टवर्तुळच बनत चालले आहे. यातून सुटका करून घेणे हे अत्यंत अवघड काम आहे. समाजात शिकणाऱ्यांची संख्या झपाट्याने वाढत आहे, त्यांच्या गरजा व आकांक्षा जलद गतीने वाढत आहेत परंतु त्यांना शिक्षण देण्यास लागणारी पात्र माणसे त्या गतीने तयार होत नाहीत. आणि मग वेळ








भागवण्यासाठी जे कोणी, मग त्यांची पात्रता कितीही कमी असो, मिळतील त्यांना घेऊन काम चालवून घ्यावे लागते, वेळ धकवावी लागते. म्हणजे संख्या Quantity जशी वाढत जाते तशी त्या प्रमाणात Quality गुणवत्ता खालावत जाते हा नियम खरा ठरताना दिसतो. खरे म्हणजे गुणवत्ता न खालावू देता अधिकाधिक लोकांना सुशिक्षित, सुसंस्कारी व गुणवत्तेच्या दृष्टीने श्रेष्ठ प्रतीचे कसे बनवायचे ही खरी समस्या आहे; व त्याला Short cut– जवळचा रस्ता नाही. लांबचा पण निश्चितपणे फलदायी म्हणजे शिक्षणाचाच रस्ता आहे; व ते क्षेत्र राजकारणी लोकांच्या अनैतिक कारवायांपासून संपूर्णपणे मुक्त ठेवल्याशिवाय, शैक्षणिक क्षेत्रात काम करणाऱ्या लोकांना पुरेशी स्वायत्तता, आर्थिक सुरक्षितता व सामाजिक प्रतिष्ठा मिळाल्याशिवाय या क्षेत्रात चांगल्या पात्रतेची व कुवतीची माणसे आकर्षित होणार नाहीत व म्हणून कार्यही चांगल्या प्रकारे होऊ शकणार नाही ही कठोर वस्तुस्थिती आहे.

नैतिक मूल्यांच्या श्रेष्ठतेविषयी व इच्छनीयतेविषयी आदर व श्रद्धा कमी होण्याचे आणखी एक कारण असे सांगता येईल की लोकांच्या मनावर व विचारसरणीवर विज्ञानाच्या आदर्शविरहित किंवा भाववादी वा वास्तववादी ( positivistic ) विचारसरणीचा बराच प्रभाव पडलेला आहे. जे जे इंद्रियगम्य आहे, निरीक्षण व प्रयोग यामार्गे ज्यांचे आकलन व निकषण होऊ शकते, केवळ तेवढ्याच गोष्टी सत्य असू शकतात; जे निरीक्षण; प्रयोग, तर्क ( अनुमान ) यांच्या साहाय्याने निकषित करता येत नाही, जे इंद्रियज्ञानास अगम्य आहे, जे तर्काच्या अतीत आहे ते असत् आहे असे भावात्मक विचारसरणीच्या लोकांचे मत आहे. जे इंद्रियगम्य नाही ते एकतर मिथ्या आहे किंवा काल्पनिक आहे कारण ते अनिकषणीय आहे, असे मानण्याची प्रवृत्ती त्यामुळे वाढत आहे. जे अतीत Transcendental आहे, जे मानवाच्या कोणत्याही ज्ञानसाधनात बसत नाही, ज्याचे प्रचलित मानसाधनांनी मापन करता येत नाही, जे शब्दांच्या साहाय्याने वर्णिता येत नाही अशा अनुभवातीत ज्या वस्तु आहेत, जी महनीय जीवनमूल्ये आहेत त्यांना विज्ञानाच्या ज्ञानपद्धतींनी जाणून घेता येत नाही अशा वस्तूंच्या आकलनासाठी वैज्ञानिक ज्ञानसाधने व पद्धती वापरली जात आहे किंवा इंद्रियगम्य निकषणक्षमरीतीने समजण्याचे प्रयत्न केले जात आहेत. परंतु वैज्ञानिक पद्धती व वैज्ञानिक साधने ही ज्यांना लागू पडत नाहीत व त्यांच्या कक्षेत ज्यांचे अस्तित्व व ज्ञान येत नाही त्यांच्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान वेगळ्या रीतीने करून घेण्याऐवजी जे उच्च आहे त्याचे त्याच्याहून कनिष्ठ प्रकारच्या वस्तूंच्या किंवा खालच्या पातळीवरील वस्तूंच्या स्वरूपात **अवकरण** Reduction करण्याची पद्धती ही अधिक शास्त्रीय व वास्तववादी मानली जाते. या पद्धतीनुसार जे उच्च आहे, थोर आहे, उदात्त आहे, अनुभवातीत आहे त्याचे अवकरण केले जाऊन त्याचे स्वरूप खालच्या पातळीवरून विशद केले जाते. म्हणजे असे करण्यात जे उच्च व थोर आहे, उदात्त आहे, त्याचे स्वतःचे श्रेष्ठ स्वरूप यथार्थपणे समजावून घेणे बाजूलाच राहून त्याचे अवकरण व त्यामुळे अवमूल्यन केले जाते आणि त्याची अनन्यसामान्यता दुर्लक्षित होऊन त्याची प्रतिष्ठा कमी केली जाते. आणि यामुळे जे थोर आहे, महनीय आहे, उदात्त आहे, ज्यामुळे मानवी जीवन उच्च पातळीवर जगता येते, त्याची अवहेलना होते व जे भव्यदिव्य आहे त्याची मानवी जीवनातून हकालपट्टी करण्यात येते. 'अवकरणाचा' हा प्रमाद सामाजिक व नैतिक संदर्भात अतिशय घातक ठरत आहे. समाजाचे जीवन नीतिशुद्ध होण्यासाठी जी थोर जीवनमूल्ये आहेत, ज्या थोर नैतिक मूल्यांवर समाजाची धारणा होत असते त्या मूल्यांना प्राथमिक व पायाभूत महत्त्व द्यावे लागते व त्यांच्याविषयी प्रत्येक व्यक्तीच्या मनात आदराची भावना असावी लागते. परंतु अवकरणाच्या प्रवृत्तीमुळे त्या मूल्यांचे खरे स्वरूप व प्रतिष्ठा याविषयी साशंकता प्रकट करण्यात येते व त्यांच्या प्रतिष्ठेविषयी आह्वान देण्यात येते. ती मूल्ये श्रेष्ठ का आहेत हे वैज्ञानिक पद्धतीने, पुरावा व निकषण ह्यांच्या साहाय्याने सिद्ध करण्याचे प्रयत्न केले जातात. परंतु मूल्यांचे स्वरूपच असे असते की मूल्ये ही अनुभवाधिष्ठित रीतीने, संख्याशास्त्रीय पद्धतीने, मापन व प्रयोगांच्या मार्गाने त्यांचे वस्तुनिष्ठ व भावात्मक निकषण व सत्यता कधीच प्रस्थापित होणे शक्य नसते. आणि ज्यांचे निकषण वैज्ञानिक पद्धतीने करता येत नाही ते सत्य नाही हे जर मान्य केले तर मूल्यांना नाकारण्याशिवाय मार्गच उरत नाही.








नीतिशास्त्रातही विश्लेषण पद्धतीचा (Analytical Method) अवलंब केला जात आहे. नीतिविषयक विधानांच्या स्वरूपाची मीमांसा केली जाते. त्यांचा प्रकार कोणता आहे, ती विधाने करण्यामागे कोणती पार्श्वभूमी आहे, काही विधाने आज्ञार्थक असतात तर काही इच्छाप्रदर्शक असतात; काही उपदेशात्मक स्वरूपाची असतात व बहुतेक विधाने ही प्रवृत्तीनिदर्शक असतात असे विधानांचे विविध प्रकार कल्पून त्यांचे उपपादन करण्यात येते आणि मूल्यांच्या खऱ्या स्वरूपाचा विचार बाजूस टाकण्यात येतो. खरे म्हणजे मूल्यांची युक्तता ही अनुभवाधिष्ठित रीतीने उपयुक्ततेच्या भूमिकेवरून न ठरविता ती अनुभवपूर्व a-priori रीतीने गृहीतकृत्ये म्हणून प्रस्थापित करावयाची असते. मूल्ये ही आदर्शरूपी असतात व म्हणून ती अनुभवाधिष्ठित करता येत नाहीत व त्यांच्या व्यतिरिक्त इतर कारणास्तव युक्त ठरविता येत नाहीत. त्यांच्या ठिकाणी एक प्रकारची स्वयंसिद्धता असते.

सामाजिक व्यवहार शांततेने, सुसंवादित्वाने, सहकार्याने, सचोटीने व प्रामाणिकपणे चालविण्यासाठी काही सामाजिक मूल्यांचा आचार हा अपरिहार्य व म्हणून बंधनकारक व्हावा लागतो कारण ती मूल्ये पायाभूत म्हणून गृहीतच धरावी लागतात. त्यांची युक्तता प्रस्थापित करण्यासाठी इतर निकष व युक्तिवाद याचा अंगिकार केला असता त्यांच्या साहाय्याने त्यांची युक्तता प्रस्थापित करता येत नाही व अनुभवाधिष्ठित अशा वैज्ञानिक पद्धतीचा नीतिशास्त्रासारख्या आदर्शक (Normative) शास्त्रात उपयोग करणे हे बुद्धिवादी दृष्टीने पाहिल्यास चूकच म्हणावे लागेल. जे जेथे लागू पडू शकत नाही तेथे ते लागू करणे हे विवेकदृष्ट्याही गैरच मानावयास पाहिजे. यादृष्टीने पाहता सध्या समाजात मूल्याची अवहेलना होण्याचे कारण बऱ्याच अंशी वैज्ञानिक पद्धतीचा गैरवापर हे होय

हल्लीच्या वास्तववादी व भावात्मक विचारसरणीचे दुसरे एक अंग उपयुक्तता हे आहे. हल्ली प्रत्येक गोष्ट योग्य की अयोग्य, चांगली की वाईट आहे हे तिच्या उपयुक्ततेवरून ठरविण्याची (utilitarian) प्रवृत्ती वाढत आहे. सत्य किंवा जीवनमूल्य हे उपयुक्त जरूर असावे; त्याने जीवनाचा विकास व उन्नती करण्याचे कार्य अवश्य करावे. म्हणजे सत्य निरूपयोगी किंवा उपयुक्ताविहीन असता कामा नये, हे खरेच. आणि जे खरे सत्य किंवा मूल्य असते ते जीवनाचा विकास व उन्नती यांना पोषक व वर्धक असते. परंतु मूल्याचे स्वरूप केवळ व पूर्णतया उपयुक्तता असते असे मात्र मानून चालणार नाही. उपयुक्तता हे सत्याचे किंवा मूल्याचे हार्द व सार होऊ शकत नाही. उलटपक्षी काही जीवनप्रकार व आचार हे उपयुक्त आहेत, यशाची प्राप्ती करून देतात व म्हणून चांगले असतात असेही म्हणणे घातक ठरते. काही सामाजिक व राजकीय व्यवहारात खोटे बोलणे, अप्रामाणिक वर्तन करणे, खोटी वचने देऊन ती न पाळणे, संकुचित मनोवृत्तीने गटबाजी करणे, डावपेच लढविणे व कुटिल कारस्थाने करणे इत्यादी प्रकारांनी म्हणजे नैतिकदृष्ट्या वाममार्गाचा अवलंब करणे हे सत्ता व संपत्ती मिळविण्याचे उद्दिष्ट प्राप्त करून घेण्यास साहाय्यक व पोषक ठरू शकत असेल परंतु त्यामुळे अनीतिमय आचरणाची श्रेष्ठता, युक्तता व आवश्यकता सिद्ध होत नाही. उलट यामुळे वाममार्गाची सामाजिक व्यवहारात सरशी होत जाऊन त्यामुळे समाजात चारित्र्य, पावित्र्य सचोटी नैतिकशुद्धी या उच्च गुणांविषयी उपेक्षेची व अनादराची भावना निर्माण होते व समाजात संधिसाधूपणा, लबाडी, कारस्थानीपणा व अनीती ह्यांचा अधिक प्रसार होऊ लागतो. त्यामुळे संपूर्ण सामाजिक जीवन भ्रष्ट व अमंगल होऊ लागते. आणि त्याचा परिणाम असा होतो की व्यक्तीस स्वतंत्रपणे आपले गुण व कुवत यानुसार स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा पूर्ण विकास करून घेण्यास संधी मिळत नाही. आणि समाजात न्यायाचे तत्त्व नसेल, गुण व चारित्र्य याविषयी आदर वाटत नसेल, शारीरिक सामर्थ्य, पैसा, लबाड्या, कपटनीती, स्वार्थीपणा, संधिसाधूपणा व ढोंगबाजी यांच्या साहाय्याने जर व्यवहार चालत असतील तर त्या समाजात गुंडगिरीशिवाय दुसरे काय चालणार ? अनीतिमूलक आचारांनी समाजात सद्‌गुण व चारित्र्य यांना मान राहात नाही आणि गुणवत्तेची उपेक्षा होत गेल्याने नैतिक सद्‌गुण व शुद्ध चारित्र्य यांनी व्यक्तीचे व समाजाचे जीवन उन्नत, पवित्र व मंगल होते म्हणून सद्‌गुणांचा आचार आवश्यक आहे यावरील लोकांचा विश्वास उडू लागतो व त्यामुळे नैतिक सद्‌गुण, शील, चारित्र्य, पावित्र्य, न्याय यासारख्या मूल्यांविषयी ज्यांना आदर वाटतो अशीही माणसे साशंक

(Sceptical) बनू लागतात. थोडक्यात दुराचरणी लोकांना भौतिक सुख, व्यावहारिक यश व समृद्धी यांचा लाभ होतो व सदाचरणी लोकांची त्यांच्या सदाचरणावरील आग्रहामुळे गळचेपी होऊन त्यांच्या कपाळी दारिद्य, हालअपेष्टा, उपेक्षा व अवहेलना येते असे वाटू लागून लोक नैतिक सदाचरणासंबंधी संशयी बनून त्यांच्यात वैफल्याची भावना दृढमूल होऊ लागते. नैतिक सद्‌गुण, चारित्र्यसंपन्नता, भौतिक सुख व समृद्धी यांच्यात परस्परसंबंध नसतो ही गोष्ट सुप्रसिद्ध कान्ट या थोर तत्त्वज्ञान्यालाही चिंता करावयास लावणारी ठरली.

किंबहुना वास्तववादी व भौतिक प्रवृत्तीने कशालाच स्वतःचे स्वतंत्र, स्वयंसिद्ध महत्त्व व प्रतिष्ठा मान्य न केल्याने व प्रत्येक गोष्टीचे व्यापारी पद्धतीने मूल्यमापन करण्याच्या प्रवृत्तीमुळे जीवनातील सर्वच गोष्टींचा जणू बाजार बनला आहे व सद्‌गुणांचेही उपयुक्ततेवर आधारून व्यापारी पद्धतीने मापन व मूल्यांकन होऊ लागले आहे ही गोष्ट उच्च नैतिक व आध्यात्मिक जीवन जगण्यास खरोखरच बाधक व मारक ठरणारी आहे, यात शंका नाही. अर्थात् यामुळे 'बळी तो कानपिळी' हा जो जंगलाचा कायदा समजला जातो त्याचेच अधिराज्य अप्रत्यक्षपणे समाजात होते व म्हणून सर्व संस्कृती नैतिक उन्नती, समता, लोकशाही, स्वातंत्र्य यासारख्या थोर मूल्यांना हरताळ फासला जाण्याशिवाय हल्लीच्या प्रगत समाजात दुसरे काही होऊ शकत नाही हा ह्या काळाचा 'विरोधाभास' (paradox) आहे.

वास्तववादी व भाववादी (positivistic) विचारसरणीचा असा एक महत्त्वाचा परिणाम झाला आहे की जे इंद्रियांना अगम्य आहे, पार्थिवाच्या अतीत आहे, जे तर्काला अगम्य आहे व जे प्रयोग व इतर अप्रत्यक्ष रीतीने वैज्ञानिक पद्धतीने सिद्ध करता येत नाही त्याचे अस्तित्व नाकारण्यात येत आहे. ह्याचाच एक भाग असा आहे की मानवाचे जे शारीरिक, मानसिक व बौद्धिक रूप आहे त्याच्यापलीकडे अदृश्य असे जे आत्मरूप आहे ते निरूपणीय नसल्याने नाकारण्यात येत आहे. त्यामुळे माणसाचे जे रूप व प्रतिमा आलेखली जात आहे ती सर्व-सामान्य, भुक्तिप्रिय, पार्थिव सुखाला आसावलेल्या व शारीरिक सुखात पूर्णपणे गुरफटलेल्या अशा माणसाची आहे; व माणसाचे हे रूप आदर्श व अंतिम मानले जाऊन आणि ज्यासाठी त्याने जगा-यचे आहे, धडपडावयाचे आहे त्या त्याच्या इच्छा, आकांक्षा, प्रवृत्ती या पार्थिवाच्या रिंगणात फिरत राहणाऱ्या अशाच आहेत. शरीर, मन व बुद्धी यांच्या पलीकडे माणसाचे जे व्यापक, विकारातीत, शांत व अनंत असे आत्मरूप आहे ते कोणत्याही भौतिक, प्रायोगिक, निरीक्षणात्मक मार्गाने व्यक्त व सिद्ध करता येण्यासारखे नसल्याने व ते सर्वांना अवगत करून देता येणेही शक्य नसल्याने ते पूर्णपणे नाकारले जात आहे. त्याचा परिणाम असा होतो आहे की मानवाच्या शारीरिक, मानसिक व बौद्धिक भुका व गरजा यांची तृप्ती करीत राहणे हे मानवाचे अंतिम उद्दिष्ट होऊन राहिले आहे. म्हणजे कामवासना, विकार, मनाच्या व बुद्धीच्या आकांक्षा ह्याच मानवी आचारांच्या व विचा-रांच्या अंतिम प्रेरणा मानल्या जात असल्याने त्यांची तृप्ती करणे, पार्थिव सुखाचा पाठपुरावा करीत राहणे हेच व्यक्तीचे, शिक्षणाचे व समाजाचे ध्येय बनले आहे. त्यामुळे सर्व मानसिक व बौद्धिक व्यवहार हे माणसाचे शारीरिक व भौतिक सुखांची प्राप्ती करून घेण्यासाठीच करण्यात येत आहेत. पार्थिवाच्या अतीत वस्तूंना नाकारण्यात आल्याने, पार्थिवाच्या अतीत असलेल्या विकारातीत, व्यापक व शांत अशा आध्यात्मिक जीव-नाला काल्पनिक व मिथ्या ठरविल्याने पार्थिव सुखाची साधने ही मौल्यवान् गणली जात आहेत व त्यांच्या प्राप्तीसाठीच मानवाचे सर्व प्रयत्न चालू आहेत. पार्थिव व भौतिक सुखांची प्राप्ती करून देणाऱ्या वस्तूंच्या प्रचंड निर्मितीसाठी अहोरात्र प्रयत्न चालू आहेत व त्यातच मानवाची बरीचशी शक्ति वापरली जात आहे. परंतु हे करण्यात मानवास सतत किंवा शाश्वत टिकणारे समाधान व शांती मात्र लाभत नाही. पार्थिव सुखांचा सतत आस्वाद घेत राहूनही त्याला संतोष, समाधान व शांति मात्र लाभत नाही. सुखाच्या व चैनीच्या सागरात पोहत असताही मानवास आंतरिक तृप्तीचा व पूर्तीचा आनंद व समाधान यांचा लाभ होत नाही. समृद्धीच्या महासागरात मानव आंतून मात्र रिताच (empty) राहतो. सुखचैनीच्या साधनांच्या प्रचंड पुरवठ्यातही मान-वाच्या अंतरंगात मात्र पोकळी (void) शून्यता, रिक्तता अनुभवायला येत आहे. सुखाची, तृप्तीची, समाधानाची प्रत्यक्ष अनुभूती ज्याला येते तो **आत्मा**






कोण आहे, त्याचे खरे स्वरूप कसे आहे, त्याची खरी गरज, भूक, आकांक्षा कोणती आहे, त्याला नेमके काय हवे आहे व कशाने त्याला तृप्तीचा, पूर्तीचा व समाधानाचा आनंद मिळू शकेल ह्याचा मूलभूत विचार आपण करीनासे झाल्याने ज्या शारीरिक, मानसिक व बौद्धिक सुखांच्या मार्गाने आपणास तृप्ती, शांती व समाधान लाभणार नाही त्यांच्याच मागे वेड्या आशेने आपण शाश्वत सुखाची व समाधानाची अपेक्षा करू लागलो आहोत. भौतिक सुखांचे स्वरूपच असे आहे की आपण ते कितीही काळ व कितीही अधिक प्रमाणात वाढविले व उपभोगत राहिलो तरी तृप्ती लाभत नाही. थोडक्यात "भोगा न भुक्ता वयमेव भुक्ता। तृष्णा न जीर्णा वयमेव जीर्णाः।" या भर्तृहरीच्या उक्तीप्रमाणे मानवाची अवस्था झालेली आहे. सुखाची सतत कास बाळगणाऱ्या मानवाला तो सुखप्राप्तीसाठी चुकीच्या मार्गाने धडपडत राहिल्याने त्याच्या पदरात सुख पडू शकत नाही अशी त्याची केविलवाणी अवस्था झाली आहे. मानवाच्या व्यवहारांचे व आचारांचे अध्यात्मीकरण होण्याच्या मार्गातील दुसरी एक महत्त्वाची अडचण अशी आहे की धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व ( Seculiarism ) केवळ राज्यसंस्थेच्या बाबतीतच नव्हे तर ते जीवनाच्या सर्व अंगप्रत्यंगांवर प्रभाव टाकणारी अशी प्रवृत्ती बनले आहे. धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व हे जे पार्थिवाच्या अतीत आहे त्याचे अस्तित्व व महत्त्व नाकारते. मानवाचे सर्व जीवन, त्याच्या आशाआकांक्षा, त्याची उद्दिष्टे, त्याच्या जीवनाचे ध्येय हे केवळ पार्थिव व व भौतिक यांच्या कक्षेत मर्यादित राहिले पाहिजे व जे अति पार्थिव आहे ते दृश्यमान नसल्याने व निकष लावून सिद्ध करता येत नसल्याने ते असत् व मिथ्या समजावयास पाहिजे असा धर्मनिरपेक्षतेच्या तत्त्वाचा अभिप्रेत अर्थ आहे. अति पार्थिवावर विश्वास ठेवणे म्हणजे विज्ञानविरोधी, अंधश्रद्धात्मक व भोळसटपणाचे लक्षण आहे; अतिपार्थिवावर विश्वास ठेवणारी माणसे ही अज्ञानी व बौद्धिकदृष्ट्या मागासलेली आहेत असेही या तत्त्वाच्या अनुरोधाने म्हणण्यात येते. म्हणजे धर्मनिरपेक्षता ही मानवाला पार्थिवता व भौतिकता यांच्या कक्षेत मर्यादित करून ठेवण्यास जबाबदार आहे त्यामुळे उच्च नैतिक व अध्यात्मिक मूल्याविषयी उदासीनता, उपेक्षेची व तिरस्काराची वृत्ती निर्माण करण्यास धर्मनिरपेक्षतेकडून अप्रत्यक्षपणे प्रोत्साहन मिळते. थोडक्यात अतिपार्थिवतेसंबंधी उदासीनता, उपेक्षा व तिरस्कार निर्माण करणाऱ्या बऱ्याच गोष्टी घडत आहेत व मानवाचे लक्ष भौतिक व पार्थिव उद्दिष्टावर व सुखोपभोगावर केंद्रीभूत करण्यात येत आहे व त्याचा परिणाम असा होत आहे की मानवाचे विचार, आकांक्षा व उद्दिष्टे मर्यादित होत जाऊन पार्थिवाचाच पाठपुरावा केला जात आहे. भौतिक उपभोगांच्या वस्तूंची मागणी प्रचंड प्रमाणावर वाढत आहे व निर्मिती कमी पडत आहे. त्यासाठी प्रचंड प्रमाणात स्पर्धा होत राहून व्यक्ती अधिकाधिक आत्मकेंद्री व स्वार्थी बनत आहेत. भौतिक सुखोपभोगाच्या वस्तू व साधने कितीही मोठ्या प्रमाणात तयार होत राहिली तरी त्यांच्या भोगापासून व्यक्तींना चिरकाल टिकणारे सुख, समाधान, तृप्ती व शांती लाभत नाही. भौतिक सुखभोगांच्या मागे लागून त्यांच्या प्राप्तीसाठी माणसे आपसात जंगली स्वरूपाची स्पर्धा करण्यात व त्या स्पर्धेत यशस्वी होण्यासाठी उच्च नैतिक व आध्यात्मिक मूल्यांवर तिलांजली सोडण्यास तयार झाली आहेत स्वार्थासाठी व अपरिमित सुखोपभोगासाठी प्रत्येक मनुष्य अनुदात्त मार्गाने वागू लागला आहे. हल्लींच्या पार्थिवताप्रधान प्रवृत्ती कितीही बुद्धिप्रधान बनल्या असल्या तरी त्या जीवनातल्या पवित्र मूल्यांविषयी आदर बाळगण्यास प्रेरणा देणाऱ्या व पोषक खास राहिल्या नाहीत. आणि या भौतिक सुखोपभोगास व पार्थिव ध्येयास उद्युक्त करणाऱ्या सर्व प्रवृत्ती जीवनव्यवहारांचे नैतिकीकरण व अध्यात्मीकरण करण्यास निश्चितपणे बाधक व घातक ठरत आहेत, कारण त्या मानवाच्या वासनाविकारास व अहंकारास उत्तेजित व पुष्ट करणाऱ्याच आहेत. आणि मानवाचे शारीरिक भोग, इंद्रिय सुखे, कामवासना, विकार व अहंकार ह्यांच्या अतीत होण्यास मानव प्रवृत्त झाल्याशिवाय, त्याच्या अहंकाराचा निरास झाल्याशिवाय तो खचितच आध्यात्मिक बनू शकत नाही. अशी ही आपली सद्यःकालीन 'शोकान्तिका' आहे.

---








प्रा. एस्. एस्. भोसले

# केशवसुतांच्या कवितेचा जन्महेतु : (उत्तरार्ध)

केशवसुतांच्या कवितेचा मिश्रराग नमूद करताना त्यांच्या कवितेच्या ज्या जन्महेतूवर आपले लक्ष खिळून राहते तो हेतु वेदनानिग्रह होय. वेदनानिग्रह एक मोठे वर्तुळ मानले तर कवीला लाभणारा आनंद आणि त्याचे आत्माविष्करण ही दोन बारकी आंतर्वर्तुळे कल्पिता येतील. किंवा वेदनानिग्रह हा आदी कल्पिला तर कवीचा आनंद आणि त्याचे आत्माविष्करण हे त्याचे मध्य आणि अंत असेही म्हणता येईल. एकूण एक सलग वस्तू घनाकार घेऊन अखंड सलगतेचे दर्शन देते. त्यामुळे कप्प्याकप्प्याच्या विचाराहून वेद-नेचा समग्र विचार अवलोकिला की, त्यात सारे आकारते, सामावते.

सहज चालता चालता केशवसुतांच्या काळाकडे धावती नजर फेकून ती गोळा केली की, तो उलथापालथींचा, घालमेलींचा, ढवळाढवळीचा म्हणजेच वेदनांचा काळ होता असे जाणवते. वेदना देणारा-घेणारा, वेदना सहन करण्यास भाग पाडणारा— त्यांची आच लावणारा असा हा क्षोभकारक काळ होता : पारतंत्र्याची— स्वातंत्र्य नसल्याची- वेदना, अन्याय्य विषमतेची वेदना, दारुण असहाय्यतेची वेदना; अशा कितीतरी वेदना ळळलळत होत्या. जीवनाने झुंजावे, संग्राम मांडून बसावे, त्याला उसंतच मुळी मिळू नये अशी स्थिती होती. कदाचित् एखादा अर्धाकच्चा कवी या फेऱ्यात अडकून वेदनेच्या चक्रात पिचून जाता. वैफल्याने गपगार होता. 'जीवन ? जीवन म्हणे ! कसलं आलंय् जीवन ! शुद्ध गाढवांचा गोंधळ-मूर्खांचा बाजार !' असल्या वैतागाने वेदनेच्या चरकात स्वतःची जीवनशक्ती आणि जीवनस्फूर्ती यांचा रस गाळीत राहता. ( स्वातंत्र्यानंतरच्या काळात अधांतरी तडफडणारी असली शून्य उदाहरणे थोडी नाहीत. ) पण ठिणग्यांच्या फुलत्या कहारात 'हरपले श्रेय' शोधासाठी मानवी जीवनात उफाळून येणाऱ्या सत्त्व-स्वत्वनिष्ठ जीवनशक्तीवर दृढ विश्वास असावा लागतो. अलबत्ते गलबत्ते जीवनशक्तीचे गर्भाशय उलगडून रस्त्यावर येत असतात. मात्र केशवसुतांच्या ठायीच्या विश्वास-निर्धाराने या जीवनशक्तीबद्दल कौतुकाची भावना राखली आहे, जयनाद घुमवला आहे.

केशवसुतांच्या काळची वेदना मूकपणे सहन करता येण्याजोगी नव्हती. तिचे स्वरूपच मुळी असे की, तिच्या केवळ धगीने वाणी पुरती बसून जावी, कायम मूक व्हावी आणि तसे घडले नाही तर जनशक्तीच्या आवेगी दाहकतेने तिने तिच्या दहनाकडे मोर्चा वळ-वावा. केशवसुतांच्या कवितेचा आवेग असा दफन —दहनाकडे आहे. दफन-दहनाकडे म्हटले खरे पण खरे तर दहनाकडेच अधिक आहे : दफन-दहनात 'पुरून जाणे' समान असले तरी दहनातील पार 'भस्मणे' दफनात नाही, मुळच निर्वंश नाही. म्हणून जोर पडतो दहनाकडे ! दफन-दहनाची यातायात करा-यला टणक प्रकृती आणि निर्भय मन लागते. अन्यथा केवळ भारानेच खांदे मोडून पडण्याची नाहीतर जबर दुखावण्याची ( आणि कामातूनच निघून जाण्याची ) मोठी भीती असते. पण केशवसुतांनी, समाजातील महानाचा पराभव करणाऱ्याविरुद्ध तोच मार्ग चोखा-ळला. समाजाकडे केशवसुतांचे मनःपूर्वक लक्ष होते. त्यातील सळसळत्या घडामोडीसंबंधी जाणीव होती. समाजात राहून त्याच्याकरवी जीवाचे सारे चोचले आणि मनाचे पुरे थेर फिटवून घेऊन त्याकडे पाठ फिरविणाऱ्यांना 'मला काय त्याचे ?' वाटते. 'स्व' खेरीज एकतर त्यांना दुसरा समाज नसतो आणि असलाच तर स्वतःच्या सुखाव्यतिरिक्त त्याचे अधिक मोल नाही अशी त्यांची खुळचट ( प्रामाणिक म्हणणे उपमर्द होईल ) कल्पना असते. त्यामुळे 'स्व' आणि 'स्व' खेरीज विचार नसतो. इच्छा नसते, वाट मिळत नाही. पण केशव-सुतांचा परिसर इतका आत्मकेंद्रित नाही. तो विश्व-कुटुंबी आहे, मानवतावादी आहे. मानवतावाद्याच्या

पायाखालची वीट लांबीरुंदीत भक्कम असावी लागते. अनेकांचे बूड तीवर टेकायचे असते. केशवसुतांची बैठक तशी पक्की आहे: 'ब्राह्मण नाही, हिंदुही नाही, न मी एक पंथाचा, तेच पतित की जे आखडिती प्रदेश साकल्याचा ! ' ही त्यांची बैठक असल्याने 'कोण मला वठणीला आणू शकतो ते मी पाहे ! ' असा त्यांचा उभा प्रश्न आहे. या प्रश्नाचे प्रयोजन केशवसुतांच्या हेतुशः कवितेने सांगून टाकले आहे, 'प्रासकाल हा विशाल भूधर, सुंदर लेणी तयात खोदा, निजनामे त्यावरती नोंदा, बसुनी का वाढविता मेदा ? विक्रम काही करा, चला तर ! अटक कशाची बसला घालुनि ?' – हे सारे करायचे तर झुंजण्याची, झगडण्याची, झेपावण्याची, तसेच काही घडले तर टाकून देण्याची आणि झटकून मोकळे होण्याची मनाला आदत हवी. कुऱ्याचे जिणे कंठतात त्यांच्याकडे पेटण्याची, पेटवून घेण्याची आणि पेटवण्याची कसलीच शक्ती असत नाही. ते जीवन जगत नाहीत असे काही म्हणता येणार नाही पण जीवनातला संग्राम हरवून बसतात असे मात्र म्हणता येईल. जीवनाने सतत तडजोडीकडेच धाव घेण्यात जीवनाचा अपमृत्युच असतो. केवसुतांनी तो पत्करलेला नाही. केशवसुत-कवीने समाजातल्या जातिनिर्बंधघातक चाली, लांगूलचालन, गाप्पलपोटेपणा इत्यादी दिसेल त्या विकृतीवर, ढोंगासोंगावर, करंटेपणावर, दांभिक गैरवर्तणुकीवर स्मशानकळा आणणाऱ्या हरेक बाबीवर शब्दरूपी अण्वस्त्रांचे हल्ले चढविले आहेत. परंपरागत रूढीरुपी गंजलेल्या शस्त्रांना मोडीत काढण्याचा चंग बांधला आहे. "सर्वांगीण सुधारणा त्याला ( केशवसुतांना ) अवश्य व प्रिय वाटते हे स्पष्ट आहे." त्यामागे उसळणाऱ्या फुलत्या ठिणग्या अंगावर घेऊन चामडीचे चकांदे काढून घेण्याची तयारी राखलेली आहे. तसेच यशाच्या नादाने हरखून जाण्यासाठी मनाचे आशावादित्व जिवंत ठेवले आहे. याचे कारण असे की, केशवसुतांची वृत्तीच मूलतः विधायकाचा बसा जपणारी अध्यात्मप्रवण तथा सामाजिक आहे. अशी वृत्ती नेहमीच तत्त्वचिंतनात गढत असते. या वृत्तीचें स्वरूप स्पष्ट करताना प्रा. वा. ल. कुलकर्णी यांनी लिहिले आहे, "केशवसुतांची वृत्ती ही मूलतः अध्यात्मप्रवण आहे आधिभौतिकापेक्षा त्यांचे मन अध्यात्मामध्येच स्वाभाविकपणे अधिक रंगते जे वरवरचे आहे त्यापेक्षा जे आंतरिक आहे त्याचे संशोधन करण्याकडेच त्यांच्या मनाचा स्वाभाविक कल आहे. ते केवळ अध्यात्माची भाषा बोलत नाहीत तर अध्यात्म अंगी बाणण्याचा यत्न करिताना आढळतात... अध्यात्मविचारातून स्फुरलेली अद्वैताची शिकवण आणि पाश्चात्यांच्या संपर्काने इकडे आलेली समता, बंधुता व स्वातंत्र्य ह्या तत्त्वत्रयीची शिकवण ह्या दोन परस्परपोषक विचारसरणींच्या मंथनातून केशवसुतांचा क्रांतिवाद मात्र जन्माला आलेला आहे. खऱ्याखुऱ्या अध्यात्मप्रवण मनोवृत्तीला अन्याय, विषमता, पारतंत्र्य इत्यादी जीवनाला ग्रासणाऱ्या गोष्टींचा तिटकाराच असतो. ही दृष्टी जेव्हा जेव्हा आधिभौतिकाकडे वळते तेव्हा तेव्हा तिला प्रथम मानवाचे दुःख दिसते. व जीवनातील दुःखे कशाने निर्माण झाली आहेत ह्याचा शोध घेण्यातच ह्या मनाला स्वारस्य वाटत असते. व ही दुःखे मनुष्यनिर्मित असून त्यांच्या मुळाशी माणसाची स्वार्थपरता आहे, अज्ञान आहे असे जेव्हा त्या मनाला आढळून येते तेव्हा एकीकडे त्याला दुःख वाटते तर दुसरीकडे त्वेषाचे कड येतात. केशवसुतांच्या काव्यात आपणास ह्या दोन्हीही भावना पदोपदी अनुभवावयास मिळतात. हरतऱ्हेचा अन्याय, हरतऱ्हेची विषमता, हरतऱ्हेचे दास्य, हरतऱ्हेची दास्यपरता पाहून त्यांचे हृदय एकीकडे पिळवटून जाते तर दुसरीकडे त्यामधून उफाळून बाहेर पडणाऱ्या शब्दात त्यांच्या अंतःकरणातील संवेगाची भावना प्रगट होते." ('साहित्य': ऑक्टो. १९४९. केशवसुत : काही विचार– पृ. ५-६-७) या वृत्तीनेच 'हा बडा बंडवाला- पुढे आला' आहे. 'लोकनिंदाभय' बाजूला फेकून 'या लोकी बघुनी कभिन्न सगळा अंधार कोंदाटला, सारावा दूरि तो जरातरि, असा हेतू मने घेतला' आहे.

केशवसुतांनी 'मने' घेतलेला हेतू ठीक आहे. पण हा हेतू साध्य झाला असे केव्हा मानायचे ? त्याचा मुक्काम कुठे ? 'साधु आणि असाधु यांचे समप्रकर्षी युग' आले की मुक्काम. ते थांबायचे ठिकाण. पण मनासारखे सारे घडावे हे मनचे झाले. पण तसे ते घडले तर ते जीवन कसले ? केशवसुतांना याची जाणीव आहे. या जाणीवेने धैर्याला बळ दिले आहे. समजले आणि उमजले तेवढे जीवनाचे रूप जाणण्यात या धैर्याचे गम्य








आहे, जीवनशक्तीची नांगी आहे. त्यामुळे 'जीवन निरर्थकच-शून्यच बेटे' असे नाही तर बुऱ्याच्या निराकरणासाठी, घार आकाशात उडताना आपले पाय पोटात आणून, सारे बळ एकवटून झेप घेते तसे जरूर असते. डॉ. प्रो. पां. दा. गुणे यांनी लिहिले आहे, "नियम हे मनुष्याच्या सुखासाठी आहेत, मनुष्य नियमाकरता नाही. म्हणून जे नियम–मग ते सामाजिक असोत, व्यावहारिक असोत, धार्मिक असोत अगर राजकीय असोत–मनुष्याच्या सुखासाठी न होता दुःखकारक जाचक होतात, ते तोडले पाहिजेत हे स्वातंत्र्यतत्त्व केशवसुतांच्या सर्व कल्पनांच्या मुळाशी आहे व म्हणूनच त्यांचे काव्य जिवंत, जिव्हाळयाचे व हलवून सोडणारे असे आहे.'स्वतंत्रतेचे शाहीर' या नात्याने ते आंग्लकवी शेली व जर्मन कवी शीलर यांच्या तोडीचे आहेत, यात बिलकूल शंका नाही. त्या दोघांप्रमाणेच आपणाला सृष्टीचा–देवाचा काही संदेश मानवजातीला सांगावयाचा आहे, आपले अवतारकृत्य उदात्त व दिव्य आहे असे केशवसुताना अखेरपर्यंत वाटत होते...यामुळे आपले काव्य केवळ काही व्यक्ती अगर देश याकरिता नसून ते सर्व मानवजातीकरिता आहे, अशी आमच्या कवीची (केशवसुतांची) कल्पना असल्यास नवल नाही...(म्हणूनच) केशवसुत नुसतीच प्रीतीची रडकथा गाणारे कवी नव्हते अगर नुसत्याच कोरड्या सृष्टिवर्णनानी कालक्षेप करणारे कवी नव्हते; भोवतीचा खराखुरा प्रपंच विसरून लटक्या परमार्थाचा दंभ दाखविणारेही कवी नव्हते. परिस्थिती बरोबर ओळखणारे व शक्यतर परिस्थितीला वळण लावणारे ते प्रपंचकवी आहेत, रवींद्रबाबूंप्रमाणे संत कवी नाहीत. केशवसुत जाज्वल्य आहेत. रविबाबूप्रमाणे सौम्य नाहीत; रविबाबू प्रगूढ व्यंग्याचे भोक्ते आहेत. काहीतरी गूढ, न उकलण्याजोगे, हृदयाने केवळ अनुभवावयाचे असे 'केशवसुतांना काहीच दिसत नाही. परमार्थ, देव याविषयी विचार करण्यास केशवसुतांना मुळी वेळच नव्हता. अगदी लहानपणातच प्रपंचातील व्यवहारा--तील अज्ञान, विषमता इत्यादींची कष्टप्रद जाणीव त्यांना पटली होती. व त्या गोष्टींच्या निराकरणार्थच त्यांची कविता जन्माला आली असे म्हटल्यास हरकत नाही." (मनोरंजन : ऑक्टो. १९१५ : पु. २३ वे : पू. भा. ४ था : केशवसुतांची कविता)

हे घडले केशवसुत अर्धेमुर्धे भाजलेले कच्चे मडके नव्हते म्हणून!

'धोंडा एक समीप हो पडुनिया होता तिथे त्यावरी
गेली दृष्टि मदीय, कौतुक तधी झाले मनाभीतरी,
काकी त्या ध्वनिचे खरेपण मला धोंड्यात त्या भासले,
काढू बाहिर ते झटूनि, मग हे चित्तात मी घेतले ॥'

–अशी ज्या केशवसुतांची झटापट त्यांची वेगळी झेपण कशी असेल? धडाक्याने पुढे सरायची ज्याची हिंमत त्याने पुढेच सरावे, सरायचे. त्याने रंडागीते का गात्रीत? वळण देणारी 'रण' गीतेच गावीत, द्यावीत, लिहावीत. कारण आदेशच मुळी असा : 'हाती घेउनिया निशाण कवि तो पाचारितो बांधवा–या हो या झगडावयास सरसे व्हा, मेळवा वाहवा, प्रेतेही उठवील जी निजरवे, ती तो तुतारी करी, आता नादवती, निरर्थ तर ती त्याची कशी चाकरी? आशा, प्रेम, तसेच वीर्य कवनी तो आपल्या गाइल, गेले वैभव गाउनी स्फुरण तो युष्मन्मना देईल',– असल्यानंतर न टळणारे होष्यमाण मनोवांच्छित वृत्तीने हाती आणण्यासाठी 'पुरुषार्थ नव्हे पडणे रखडत!' तरीही या वाटचालीत दुर्मुखलेल्यापुढे कधीमधी 'जायाचे जग का असेच?' असा विचार क्षणभर मनावरून झरझरून जातो. पण 'जगामधी या तुला कशाला परमेशे धाडिले?' या प्रश्नार्थकाने झरझरणे विरते; 'कोठे जातोस?' ने ते पुरेच विरते आणि मग शब्दांना आवाहन होते, 'शब्दानो! मागुते या!' शेवटी शब्दच होऊन जाणाऱ्या शब्दांच्या दासांचे सामर्थ्य वाणी आणि अर्थ यात उभे असते. "दैनंदिन जीवनातील नवा आशय काव्यरूपाने टिपण्यास प्रारंभ करणाऱ्या" केशवसुतांनी शब्दातून घुमविलेला अर्थाचा ध्वनी वेदना वितळविण्यास साहाय्य करणारा आहे. म्हणून 'द्या उत्तेजन हो कवीस, न करा गाणे तयाचें मुके' असा 'अवधानाचा चारा' ते मागतात. त्यातून ते 'प्रमेयाची दोंदे' पेलणार आहेत. हे सामर्थ्य वेदनानिग्रहात विनिमय पावणारे असले तरी वेदनानिग्रह ज्याद्वारा व्हावयाचा त्याचे म्हणून काही घटक आहेत. अरेबियन नाईट्समधल्या कोळयाच्या कथेतील राक्षसासारखी अगडबंब वेदना आपली पाय पसरून पडली आहे आणि तुरकाटीने तिला ढकलून दूर करण्याचे असफल प्रयत्न सुरू आहेत असे नव्हे तर घटकाघटकावर हल्ले करून आखबंद ढिग कोसळून







टाकण्याचे प्रयत्न सुरू आहेत; जेणे करून कार्य अधिक जलदीने घडण्यास मदत मिळणार आहे. हे घटक तरी कोणते ? पारतंत्र्याबद्दलची असीम चीड -स्वातंत्र्यावरची अनिवार आसक्ती एक, जातिभेदाचा कॅन्सर नष्ट करणे दोन, मजुरादी असमर्थांना अन्न -वस्त्रआसरादी बाबी तीन, सोयऱ्याधायऱ्यांचा वियोग विरह चार-असा हा मामला आहे. या साऱ्याच्या मुळाशी 'सोन्याचे सरले अहा ! दिवस ते आली निशाही कशी, सौख्याचा नद तो सुकून पडलो या दुःखपंकी फशी ! कालक्रीडित हे बघून रडला, हे व्यस्त काही नसे'; ही मनोव्यथा आहे. पण कालक्रीडिताने अश्रूंचे वाहवणे नाही तर तेही बदलू-बदलूच हा आत्मविश्वास आहे. पण म्हणून 'स्वोत्कर्षाचा रवि' मावळून 'ऱ्हासाची निबिड रजनी छळाया' पातल्याने 'दुःखाचा तोवरि खचित तो भोग आहे अम्हाला !' असे परंपरागत मन अधूनमधून म्हणत असले तरी कवी दैववादी नाही, कर्मवादीच आहे. नास्तिक्यात भेटणारे म्हणून जे एक आस्तिक्य असते ते अशा दृष्टीत भेटते. दुर्दैव्यांचे नशिबी' 'स्वतंत्रतेची पहाट' आणि 'उत्कर्षाचा दिन' असेल की नाही अशी शंका मनाला चाटून जात असतानाच मित्राला आवाहन होते, 'कोठे असशिल आता मित्रा माझे ? करीत असशिल काय काम ती काजे ? देशासाठी शरीर झिजवायला स्फूर्ती आणित असशिल का कोणाला ?' म्हणजे देहाचा इच्छातारा देशावरील काळी निशा नष्ट करण्याच्या कामी खर्ची पडण्याच्या दृष्टीने लागलेला. कवीची ती मनोभावना. या मनोभावनेने आमुच्या कराही यत्न व्हावेत ही तीव्र इच्छा. आप्तापासून मित्रापर्यंत साऱ्यांना त्यासाठी आवतण आहे. वस्तुतः आवतण जावे आणि मगच हलावे अशी काही ही बाब नाही. स्वेच्छेने पुढे यावे अशी ही मॅझिनी-भावना. पण काळाचाही काही गुण असतो. पुढे सरायला, आहे तिथेच खिळवून ठेवायला आणि मागे हटवायला काळही कारण होतो. त्याचे चिरंबंदीपण कधी कधी माणसाच्या आकलनाच्या बाहेर असते. म्हणूनच जागे न झालेल्या, जागे होऊनही आपल्याबरोबर कुणी जागे झाले आहे काय हे डोळे किलकिले करून पाहात पाहात हालचालीचा विचार असणाऱ्या सर्वांना जागे करण्यासाठी असली आवतणे जरूर असतात. दहाजणाना बरोबर न्यायचे तर 'चला ! चला !!' चा हाकारा द्यावाच लागतो. त्याखेरीज न हालण्याची त्याची वृत्ती असते. स्वतःला जमेल, झेपेल तेवढे सुरूच आहे, पण इतरांचा साह्यभार पोचला तर तेवढीच गती ! म्हणून मित्राप्रमाणे बापूला 'बापू ! गड्या ! ध्वज उभा करशिल काय ? तू देशकारण करू झटशील काय ? बापू ! जगात दिवटी धरशील काय ? स्वातंत्र्यदेव मनसा भजशील काय ?' अशी हाक दिली आहे. या साऱ्यात पोटतिडिकीने भरलेले एक आर्त आहे. ते 'एका भारतीयाचे उद्गार' मध्ये 'देवा ! केव्हा परवशपणाची निशाही सरून, स्वातंत्र्याचा द्युमणि उदया यावयाचा फिरून ? केव्हा आम्ही सुटुनि सहसा पंजरातूनि, देवा राष्ट्रत्वाला फिरुनि अमुचा देश येईल केव्हा ?' यात परिणत झाले आहे. पण मला पुनः पुन्हा एक गोष्ट जाणवते ती ही की, सामाजिक कवितेत केशवसुतांचा आढळणारा सर्वंकष आवेग आणि प्रक्षोभ त्यांच्या राजकीय मानल्या गेलेल्या कवितात का आढळत नाही ? काहीशा संथपणाने तिथले वातावरण शीतळ का राहते ? "तत्कालीन वातावरण राजकीय चळवळीपेक्षा सामाजिक आंदोलनांनी अधिक क्षुब्ध झाले होते" हे त्याचे एक कारण असेल. किंवा माझ्यामते दुसरेही एक संभवते. आमची देशभक्ती मुळातच क्षीण-संकटकाळी धडपडून जागी होणारी, इतरवेळी बरीचशी सुस्तावून पडणारी. अशा गाळाला फुंकर घालून चेतवायचे ते लाजाळू स्पर्शानेच अधिक बरे. कदाचित हेही असेल. सामाजिक कवितेच्या विषयसृष्टीतही याचे प्रत्यंतर मिळते. राजकीय स्वातंत्र्याबरोबरच सामाजिक स्वातंत्र्य हवे; त्याविना स्वातंत्र्याला पूर्णता नाही. कुणाना कुणाच्या एकाच्या अभावाने कुणा ना कुणाचे एकाचे अर्धांग पक्षघात झाल्यागत अजागळासारखे किळसवाणेपणे लोंबत राहील, म्हणून सर्वच बाजूनी पूर्णता हवी; असा केशवसुतांचा विचार असला तरी सामाजिक कवितेत क्षुब्ध करण्याचे सामर्थ्य आधिक्याने आहे. 'अंत्यजाच्या मुलाचा पहिला प्रश्न' म्हणूनच निपजला. 'मजुरावर उपासमारीची पाळी' आल्यावर 'सर्वांस देवा ! बघतोसि सारखा, होतोस का रे गरिबास पारखा ? काहीस सुग्रास सदन्न तू दिले, साधी अम्हा भाकरहि न का मिळे ?' - असा










धीट प्रश्न आला. आतापर्यंत देवाला दरडावून प्रश्न विचारला तो तुकारामाच्या उपेक्षित जिजाईनेच. 'काळतोंड्या विठ्या' म्हणण्याचे साहस तिच्यानेच करवले. बाकी साऱ्यांनी केकांची आवली म्हटली. पण आदब राखून कळवळ्याने मजुराने काहीसा तसाच प्रश्न विचारण्याचे धाडस केले. पुढे घडणाऱ्या रुद्राच्या रूपाचा असा छोटासा आविष्कार केशवसुतांच्या आशावादी मानवतावादी निष्ठेने केला आहे. मार्गाचे सूचन नसले तरी उरात पिचून गेलेल्यासाठी सद्भावयुक्त सहानुभूतीच्या धारांची वर्षा आहे. अर्थात् मार्गसूचन हे काही केशवसुताचे काम नव्हते-नव्हे! ते आगरकर-टिळक-गोखले यासारखे विचारवंत महोदय करीतच होते. केशवसुतांना त्याची गरज नव्हती. 'काहीतरी तरावया गावे' ची पठडी वळून 'साऱ्यांतरी तरवावया गावे'ची संथा घेतली ती आगरकर, टिळक यांच्या विचारांचे केवळ पुनर्लेखन किंवा 'नवलेखन' म्हणून नव्हे. आंतरिक उचंबळीतून जीवीच्या जिव्हाळ्याने लिहिणाऱ्याला पुनर्लेखन जमत नाही. नव्या उन्मेषाची तीच तर मुळी गंमत आहे. समाजाच्या चेहऱ्यावरील जीर्णता आणि त्याच्या आचार-विचारांना आलेली भ्रष्टता पिटाळायची तर निर्जीव पुनर्लेखन मूल्यहीनच होते. वंचिताजवळ जाताना शोकाचा सागरही निरुपयोगी असतो. असले काही तिथे लागीचेच नसते. तिथे अमित संकटे लंघित करणारी झेपणच उपयोगी! कुजल्या-सडलेल्या आणि अधिकाधिक 'वर्स' होत चाललेल्या समाजाला उभे करायची हिंमत बाळगायची तर तसा रजेराच कामाचा! आयुष्यावर निराशेची छाया असणाऱ्या, करपलेल्या हृदयासाठी निर्भरतेने गर्जणाऱ्या विचारांचे कल्लोळच हवेत. रुढीची-अन्यायाची गिधाडे भोवती घिरट्या घालीत असताना समाजाची होणारी अधोगती-अवनती रोखण्यास मानवी कर्तबगारीवरील भरवसा मोलाचा ठरतो. "बंधनातून सुटण्याची नूतनतर खटपट" करणाऱ्या केशवसुतांनी त्याचे दर्शन दिले आहे. चाललेल्या खडतर प्रवासात सोयऱ्याधायऱ्यांच्या स्नेहाने ते दीप्तीसंपन्न केले आहे. अन्यथा आर्थिक टंचाईपासून 'एकलेपणाची आग' थंडावण्यापर्यंत- नाही म्हटले तरी जिथे सारे दिडक्या चालीने चालणारे तिथे मनाचा ताजेपणा राखण्यासाठी सगेसोयरे हवेतच. शेवटी समाजाचे नाते ऋणाचे; सग्यासोयऱ्यांचे रक्ताचे. पहिल्याहून दुसरे अधिक घट्ट. पहिल्यात देण्याघेण्याचा, फेडण्यासवडण्याचा भाग येतो. दुसऱ्यात 'फिफ्टी फिफ्टी'ची तडजोड नाही. रक्ताची तडजोड अशी कधीच असत नाही. 'जग फिरले तरी आपला कुणीतरी आहे, अगदीच एकटे नाही, शेवटी कुणीतरी येईल' ही गर्भाच्या धारणेबरोबरच भर भरणारी भावना कुठलीही परिस्थिती येवो, कसलीही निराशा येवो धीर देणारी असते. 'मित्राची खोली लागलेली पाहून', 'गोष्टी घराकडिल मी वदता गड्या रे', 'नैऋत्येकडला वारा', 'आई!! आई!', 'आईकरिता शोक' सारख्या कवितातून शोक आहे पण धीराच्या रूपाने तो उभा आहे. तिथे टिच्चून भरलेल्या भावना आहेत पण असमाधानाचे भाले नाहीत. 'जीवित्व शोकसंकुल नाटक' खरे पण या धीरापोटी 'मी काल क्रमुनी असा, जड जगा काडीवजा लेखितो!' यातील 'जड जग' महत्त्वाचे आहे. शेवटी जीवनाचे सौंदर्य सत्याच्या ध्यासात, त्यासाठी प्राणाची बाजी लावून मिळविलेल्या विजयाच्या आत्मविश्वासात आहे. केशवसुतांच्या जवळ हे आहे. म्हणूनच जुनाट प्रमाणात स्वतःला गुरफटून घेण्यात त्यांना आनंद नाही, स्वतःचे सिद्धांत कुठल्यातरी साच्यात बसवण्याचा हव्यास नाही. केशवसुतांना त्यात आनंदच नाही. अर्थात् आपण काहीतरी नवीन लिहितो यात तो नाही तसाच 'नवी गीते' गाऊन आपण काहीतरी अलौकिक करीत आहोत यातही तो नाही. "नवा कमी नसून जुन्यावर ताण केली आहे" असे समीक्षकांनी म्हणावे, केशवसुतांना त्याचे काही नाही. आपल्या अनुभूतीचा शोध घेत घेत भावोत्कटतेने जाणवले त्याचे शब्दांकन करण्यात त्यांचा आनंद आहे. आधुनिक मराठी कवितेच्या प्रारंभकाळी केशवसुतांनी ही जाणीव पक्की केली. वस्तुतः प्रा. वि. म. व. गो. म. कुलकर्णीद्वय 'झपूर्झा'च्या संपादकीयात लिहितात त्याप्रमाणे; चारचौघात मिसळण्याचा त्यांना कंटाळा होता. व्यावहारिक दृष्ट्या त्यांचे आयुष्य एकलकोंडे व एकमार्गी होते; त्यातच त्यांच्या साध्या संकोची, मितभाषी, मानधन, अंतर्मुख वृत्तीची भर पडलेली. "Poets as dreamers should sit aloof, listening to the etherical voice of silence."

ही त्यांची भूमिका असल्याने समानधर्मीयांचा मेळा-वाही त्यानी आपल्याभोवती कधी गोळा केला नाही. आणि जगाने तर त्यांच्या एककल्ली, विमनस्क, नादी वृत्तीला उद्देशून ' मास्तर भ्रमिष्ट आहेत झालं ! ' असा शेरा केव्हाच देऊन टाकला होता ! ......केशवसुतांच्या या बऱ्याचशा नीरस व निरंग अशा जीवन-चित्राच्या पार्श्वभूमीवर त्यांचे काव्यात्म प्रखर व्यक्तिमत्त्व किती उठून दिसते ! केशवसुत म्हटले की, तेजाचा अभिनव बाणा मिरविणारे, बंडाचा झेंडा हातात घेऊन धामधूम उडवून देणारे, ' कोण मला वठणीला आणू शकतो ते पाहू ' असे उद्दाम आव्हान देणारे, ' जुने जाऊ दे मरणालागुनि ' असा पुकारा करणारे, ' देवदानवा नरे निर्मिले ' असे ठणकावून सांगणारे एक साहसी, आक्रमक, विमुक्त, घणाघाती व्यक्तिरव डोळ्यासमोर उभे राहते; यातच त्यांच्या व्यक्तिरवातील गूढ, विमनस्क, आर्त अशा काही छटा मिसळल्या जातात आणि मग त्याला विलक्षण गहिरेपणा प्राप्त होतो ...... केशवसुतांच्या कवितेपेक्षा तसूभर अधिकच त्यांच्या या ' काव्यात्म व्यक्तित्वा'चे सौंदर्य वाचकाला वेढून टाकते...... ' ( पृ. ११-१३ ) केशवसुतांच्या काव्यात्म आविष्काराचे प्रत्ययकारी चित्रण आणि त्यातून व्यक्त होणारा कवीचा आनंद-तोही वेदनानिग्रहाशी निगडीत असणारा—केशवसुतांच्या कवितेत खरे मोलाचे काय असेल ते हेच होय. या मोलाचा प्रभाव त्यांच्या निसर्गापासून प्रेमापर्यंतच्या अनेक कवितातून दिसतोच पण तो अधिक दिसतो कवि आणि काव्यविषयक कवितातून ! ' कविता आणि कवि ', ' कवितेचें प्रयोजन', ' कल्पकता ', 'शब्दानो ! मागुते या ! ', ' स्फूर्ति ', ' काव्य कोणाचे ? ' ' प्रतिभा ', ' आम्ही कोण ? ' इत्यादी कवितातील केशवसुतांचा एतद्विषयक दिमाख अगदी ओझरत्या नजरेनेही पाहून घ्यावा. एकशेतेरा वर्षानंतर माटुंगा रेल्वे अपघाताने मुंबई शहराला धक्का बसावा तसे काहीसे केशवसुतांमुळे मराठी काव्यप्रांतात घडले; संत-पंत-तंत काव्याच्या भूमीतून निपजलेल्या केशवसुतांनी घटपटादि खटपटीच्या जंजाळात असलेल्या कवितेच्या हेतूला अलोट चैतन्य प्राप्त करून दिले. ' अस्मत्समाजातुनी शिथिलता ' जाताना आणि ' युरोपीय उमदे राऊत वाखाणिले ' जात असताना ' विश्वामाजी पसरत जाणारी विभूती ' गमलेले केशवसुत स्वतःतल्या बुद्धीच्या निश्चितेतेने ' हृदयातुनि न जे बोल, निघती, ते सगळे फोल ' असे धीरशीलतेने सांगत होते. ' सोमाचा रस वेदकाळच्या ऋषिवर्यांनी उकळिला शेष तयाचा द्या तर लौकर पिपासु जे त्या आम्हाला ' मधून केशवसुतांच्या आखल्या व्यक्तित्वाचे सावट मिळत होते. ' सभारूपी पाहुनि ' काव्याचे नटणे नसून साऱ्या जीवनाला कवटाळणारी ती सोमशक्ती याच्या घोष-चलनात केशवसुतांनी स्वतःच्या दमदार आत्माविष्करणाबरोबर मोठा आनंदही मानला आहे. केशवसुतांच्या ' जागल्या'च्या भूमिकेत त्यांच्या आत्म्याचे आवाहक आत्माविष्करण पुरेपूर आहे : कलात्मक ( विशेषतः कवीला होणारा आनंद आणि आत्माविष्करण या दृष्टीने ) याहून वेगळा विचार मांडता येणारा आहे पण अनेकातील एक जन्महेतूशी विवेचन आखून घेतल्याने कलावेधी किमया दूर राखणे स्वाभाविक झाले आहे. म्हणून बाकी काही असले तरी केशवसुतांच्या कवितेचा जन्महेतू न्याहाळताना त्यांच्या कवितेतील विचारधारा ही केवळ वाङ्मयिक नाहीतर काहीशी सामाजिक व सांस्कृतिकही आहे याचे मनःपटलावर ठसे उमटत जातात.










श्री. भाई माधवराव बागल

# माझ्या सहवासात आलेल्या तीन व्यक्ती –

## ( १ ) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

आठवत नाही बरोबर; पण बहुधा असेल १९३० साल. मी कराड तालुक्यात व्याख्यानाच्या दौऱ्यावर होतो. कराड तालुक्याच्या बटाणे या पुढाऱ्यांनी तो आखला होता. कराड जवळचेच कोणते तरी एक खेडे असावे. ( आमदार ) आत्माराम पाटीलही त्यावेळी बरोबर असावेत.

त्या माझ्या सभेत एक भटजीही बोलायला उठले. त्याना कदाचित् मुद्दाम बोलावून आणलेही असेल. पण ही स्वारी, भटजी म्हणजे अगदी भटजी ! शंभर नंबरी भटजीचा अवतार ! गुळगुळीत चकाकणाऱ्या गोट्या-वर, सहारा वाळवंटावर एखादे झुडुप डोकावल्याप्रमाणे, शेंडी लोंबत होती. मी होतो बुटा-सुटात तर भटजी होते भर सभेत अगड–बंब ! अंगावर उपरणे टाकले होते तरी जानवे आणि तुळतुळीत भोजनयष्टी काही झाकली नव्हती.

कोल्हापुरचा सत्यशोधक मी ! ब्राह्मणाकडे काही आदराने पाहणारा नव्हतो ! अन् त्यात हा अगड–बंब अवतार ! पाहताच माझ्या कपाळाला आठ्या पडल्या ! पण बोलताना बरा बोलला हा गृहस्थ ! त्या सोवळ्या अवतारात बसण्याजोगे नव्हते ते व्याख्यान. जवळ जवळ सत्यशोधकीच विचार होते त्याचे. पोषाख सना-तनी होता पण विचार भरपूर पुरोगामी–सत्यशोधकीच होते.

यामुळे प्रथमदर्शनी जो तिटकारा निर्माण झाला होता तो जाऊन ती जागा आदराने, कौतुकाने व आपलेपणाने घेतली व तीच भावना आज एप्रिल १९६६ पर्यंत टिकली आहे.

पण तेच हे भटजी असे त्यानी शपथ देऊन, पुरावा पुढे केला तरी आता खरे वाटणार नाही. असा त्यांच्या पेहेरावात, परिस्थितीत व व्यासंगात बदल झाला आहे.

हेच सोवळे गृहस्थ एकदा गांधीवादी भक्तांच्या संगतीत सहभोजनाला बसले होते. त्यात काही सर्वो-दयींच्या खास अन्नाची ताटे पडली होती. सडीचा भात, गाईचे दूध, फळे वगैरे. एकाच पंक्तीत हे अन्न-सेवकांचे वर्ग पडले होते. याच पंक्तीत कराडचे ते ब्राह्मण बसले होते. ते म्हणाले ' आणखी येथे हा कसला जातिभेद. एकाच पंगतीत हे निरनिराळे प्रदर्शन कां ? आपल्याला हे काही आवडत नाही. सर्वाबरोबर जे असेल, जे मिळेल ते खावे. आवडत नसेल तर पंगतीत बसू नये आपल्या समाजात काय कमी मतभेद आहेत म्हणून त्यात ही आणखी भर ? '

त्या पंगतीत शंकरराव देव वगैरे गांधीवादी बसले होते. कराडच्या त्या ब्राह्मणाचा तो स्पष्टपणा ऐकून मी तरी अगदी बेहद्द खूष होऊन गेलो. त्या वाक्याने तो मला ब्राह्मणजातीचा उरला नाही. तो माझाच जात-भाई झाला. सत्यशोधक !

त्या पंगतीतल्या एका गांधीवादी म्हणून घेणाऱ्याला ती स्पष्टोक्ती आवडली नाही. तो म्हणाला,

' मग निषिद्ध अन्न असले तरी ते खावे म्हणता का आपण ? '

' निषिद्ध म्हणजे कोणते ते बोला ना ? '

' अहो मांस '

' अहो मांस खाणाऱ्या पंगतीत बसला असाल तर मांस खाल्ले पाहिजे नाहीतर त्या पंगतीत बसू नये '

' मग तुम्ही मांस सुद्धा खाल काय ? '

' हो पंगतीत बसलो तर जरूर खाईन. अशी जात निर्माण करण्यापेक्षा मांस खाल्लेले मला परवडले. मांसच काय इंग्रजी समाजात बसलो तर पिईनसुद्धा '

' अहो असे बोलू तरी नका ! '

' का ? अशी मताची छपवाछपव करणे मला आवडत नाही '

या त्यांच्या भाषणामुळे त्यांच्या माझ्यामधील परकेपणा समूळ नष्ट झाला. व ते माझे मित्र आणि नातलग झाले. माझे त्यांचे संबंध जवळचे झाले. ते

माझ्या घरी आले. राहिले, जेवले. व आमचे अन्न तितक्याच गोडीने त्यानी खाल्ले.

ही व्यक्ती म्हणजे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी होय.

याच त्यांच्या स्वभाव व वागणुकीमुळे कोल्हापूर येथे रा. सा. मुकुंदराव पाटील यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या सत्यशोधक परिषदेचे उद्घाटक म्हणून तर्कतीर्थांना बोलावण्यात आले. व हे मी व भास्करराव जाधव यानी विचाराने ठरवले.

तर्कतीर्थांनी महात्मा फुले यांच्यावरही अभ्यासू व विचारप्रवर्तक लेख लिहिला आहे. आणि फुले तर सत्यशोधक, ब्राह्मण्याचे वैरी व ब्राह्मणेतर समाजाचे दैवत, ब्राह्मणेतर पुढाऱ्यांचे पुढारी व मार्गदर्शक.

मी स्वतः निरीश्वरवादी. देव, धर्म, बुवाबाजीवर मी लेखातून, ग्रंथातून व व्याख्यानातून बरेच हल्ले चढवलेले, मार्क्सवादी. त्या माझ्या हातात त्यांचे जडवाद पुस्तक पडले. मग काय ! पूर्वीहून तर्कतीर्थ आणखी जवळ आले.

त्यांचे माझे मैत्रीचे संबंध लोकांना माहीत झाल्यामुळे कोणत्या तरी एका समारंभात राजाराम कॉलेजमध्ये, मी होतो उद्घाटक व तर्कतीर्थ होते अध्यक्ष. प्रो. पंगू त्यावेळी हयात असावेत. तर्कतीर्थांची व माझी अधिक सलगी असल्यामुळे मी उद्घाटन भाषणात म्हणालो—

" आता तर्कतीर्थ बोलतील. ते अत्यंत विद्वान आहेत, अभ्यासू आहेत, पुरोगामी विचाराचे आहेत. ते मुलांना शिकवतील पण मुलांपासूनही त्यांना पुष्कळ शिकण्याजोगे आहे. ती म्हणजे सोपी भाषा. विद्वानांनी सोपी भाषा बोलायला व लिहायला शिकली पाहिजे, ते सोप्या भाषेत बोलले तरच विद्यार्थ्यांना काही तरी समजेल, नाही तर त्यांचे ते जडवाद ! ! ते पुस्तक त्यांनी लिहिले आहे म्हणून मी ते विकत घेऊन वाचले. पण त्यापेक्षा मला जडवादावरची इंग्रजी पुस्तके सोपी वाटली. व मराठी शब्द समजण्याकरता इंग्रजी डिक्शनरी उघडावी लागली ! ! ! "

यावर आपल्या भाषणात तर्कतीर्थ म्हणाले, 'माझ्या एका मित्राला मी माझे 'हिंदुधर्माची समीक्षा' हे पुस्तक वाचायला दिले. वाचून परत केल्यावर त्याला विचारले ' कसे काय आवडले का पुस्तक ? '

त्यावर तो म्हणतो, 'पुस्तक वाचनीय, मननीय व अभ्यसनीय आहे, पण आपण मराठीत लिहिले असते तर अधिक बरे झाले असते ! आता सांगा माधवरावांची टीका या मानाने किती सौम्य ! प्रयत्न करूनही सोपे लिहायला येतच नाही मला ! '

हा तर्कतीर्थांचा प्रांजलपणा मला फार आवडला.

कोल्हापुरला गंगावेशीत सत्यसमाज मंदिरासमोर व्याख्यान होते. मी अध्यक्ष असेन. मी म्हणालो,

' गीता हा कितीही उद्बोधक व महत्त्वाचा ग्रंथ असला तरी मार्क्सवादी दृष्टिकोनातून पाहिल्यास त्यात वर्गीक वर्चस्वाचा गौरव केलेला आढळतो— गरीब प्राण्यांची पिळवणूक करणाऱ्या व त्यांच्या रक्तावर जगणाऱ्या पाण्यातील ' मगरात ', पक्ष्यांतील ' गरुडात ' जनावरातील वनराज सिंहात, व माणसांतील-नरांतील नृपाधिपात—राजात ईश्वराचा अंश आहे. व राजदंडात ईश्वरी आज्ञा आहे असे प्रतिपादन केल्याचे आढळते. "

माझी ही विचारसरणी तर्कतीर्थांनी न खोडता ती मान्य केली.

हा तर्कतीर्थांचा प्रामाणिकपणा मला फार आवडला. ते आग्रही दिसले नाहीत.

या अशा प्रसंगांमुळे आणि अनुभवांमुळे आम्ही अधिकाधिक जवळ येत गेलो.

त्यानी अनेकवेळा मला वाईला व्याख्यानासाठी बोलावले. माझ्यासाठी मला आवडणारे पदार्थ हॉटेलातून आणून जेवण दिले व तेही संकोच न मानता मजबरोबर खाल्ले.

त्यांचा माझा पत्रव्यवहार असे. आज त्यांच्या इतर व्यवसायामुळे कमी झाला असला तरी तो नाहीसा झालेला नाही. त्यांची पत्रे फार मन मोकळेपणाने लिहिलेली असतात, हात आखडून लिहिलेली नसतात. मीही त्यांच्यावर तितक्याच मोकळ्या मनाने टीका करीत असे.

तर्कतीर्थांनी जडवादावर पुस्तक लिहिलेले. ते निरीश्वरवादी—सत्यशोधक. आणि सोमनाथ मंदिराचा पुरोहितपणा केलेला ! ऐकून मी त्याना बोललो,

' तर्कतीर्थ याचा अर्थ काय लावायचा ? '

ते हसले व लिजलेही. म्हणाले, ' त्याला म्हणायचा व्यवहार '



अनुक्रमणिका






माझे आत्मचरित्र 'जीवनप्रवाह' पुस्तक तयार झाले. त्याची प्रस्तावना त्यानीच लिहिली. त्याचे प्रकाशन तर्कतीर्थांच्याच हस्ते केशवराव भोसले थिएटरात करण्यात आले. माझ्या साठावीला त्यांनी 'मौज' मध्ये माझ्यावर खास लेख लिहून माझी त्या वाचकांना ओळख करून दिली व मला उपकृत केले.

अलीकडे त्यांच्या माझ्या फारशा गाठी पडत नाहीत. सं. म. समितीतर्फे आखलेल्या प्रतापगड मोर्चासाठी मी गेलो होतो. त्या मोर्चाचा ठराव माझ्याच अध्यक्षतेखाली झाला होता. तर्कतीर्थ यशवंतरावजी चव्हाणांचे परमस्नेही आणि हितचिंतक. मी त्यावेळी समितीत. तर्कतीर्थ काँग्रेसचे, त्यातही यशवंतरावांचे लाडके. यशवंतराव तर त्यावेळी समितीचे शत्रू!

पण मोर्चा पार पडल्यानंतर आणि काँग्रेसवर व यशवंतरावजींच्यावर भरपूर तोंडसुख घेतल्यानंतर मी रात्रीचा मुक्काम ठोकला तर्कतीर्थांच्यात, आणि एकमेक मिठास बोललो. दोन्ही बाजूच्या मंडळीना आश्चर्य वाटले.

आता तर्कतीर्थांची माझी फारशी भेट पडत नाही. रागावून पत्र पाठवले म्हणजे दिलगिरी प्रदर्शित करतात.

सुरवातीचे उघडेबंब सोवळे भटजी आता संस्कृतीच्या महान् पीठावर आरूढ झाले आहेत. मोठ्या जबाबदाऱ्या अंगावर घेतल्या आहेत. त्यांच्या प्रोत्साहनाने अनेक ग्रंथ बाहेर पडत आहेत.

गाठी भेटी कमी झाल्या तरी मैत्री कमी झाली आहे असे मात्र नव्हे.

× × ×

## (२) भाऊसाहेब खांडेकर

मी साहित्यिक होईन किंवा मला कोणी साहित्यिक समजतील असे कधीच वाटले नव्हते, ती माझी महत्त्वाकांक्षाही नव्हती. लिहीत होतो, पण साहित्य निर्माण करावे म्हणून नव्हे. जनतेच्या दुःखाला वाचा फोडावी, त्यांची गाऱ्हाणी सरकार पुढे ठेवावी, मागण्या मांडाव्या, हा मुख्य हेतू.

ते लिखाणही ओघाओघानेच आले.

माझे वडील 'हंटर' नावाचे साप्ताहिक काढत होते त्यात प्रुफ करेक्टिंग करता करता स्फुटे लिहू लागलो. पुढे वडिलांच्या पश्चात् 'अखंड-भारत' साप्ताहिक काढले. त्यातल्या लिखाणाला साहित्य हे नाव देता आले तर मी साहित्यिक होतो, पण रूढ अर्थाने मी साहित्यिक नव्हतो.

नाटक, कादंबऱ्या, लघुकथा या प्रांतात मी शिरलो नव्हतो. शिरेन असे नव्हते. तशी इच्छा नव्हती व आवश्यकताही वाटली नाही. मी थोडेसे मार्क्सवादी वाङ्मय वाचले होते. आणि दुःखे, पिळवणूक व जनतेची शोचनीय अवस्था पाहून माझे लिखाण मार्क्सवादी विचारसरणीकडे झुकू लागले होते.

हे लिखाण वाचून माझे परममित्र नी. गो. पंडितराव यांनी मला सुचवले.

"तुम्ही हेच विचार जर गोष्टीरूपाने मांडले तर खालच्या समाजात तुमच्याकडून समाजवादाला अनुकूल असे वातावरण निर्माण होऊ शकेल. तुम्हाला भरपूर अनुभव आहे. प्रयत्न करा. तुम्ही लघुकथा लिहू शकाल."

मी लिहायला सुरवात केली.

पहिलीच गोष्ट 'चित्रमयजगत्' मधून आली. आणि त्याचा मेहेनतानाही मिळाला. एवढे पेट्रोल भरल्यावर मग काय? आमची गिरणी सारखी चालू लागली, गिरणी म्हणजे अगदी गिरणी. आठवड्यातून दोन गोष्टी तरी नियमित बाहेर पडू लागल्या. व माझी गोष्ट कोणत्यातरी पत्रात प्रसिद्ध झाली नाही असा आठवडा जात नसे. निर्भीड साप्ताहिकात एकदा तशी टिंगलही केली : 'या आठवड्यातील आश्चर्याची गोष्ट. माधवराव बागलांची गोष्ट प्रसिद्ध झाली नाही'

यामुळे वर्ष दोन वर्षात पुष्कळ वीण बाहेर पडली.

हे पाहून पंडितराव पुढे आले व म्हणाले 'माधवराव आता या गोष्टींचे पुस्तक छापायचे. मी भाऊसाहेब खांडेकरांच्याकडून प्रस्तावना मिळवतो.'

एवढा प्रथितयश महाराष्ट्र कीर्तीचा साहित्यिक मला कुठली प्रस्तावना द्यायला. मी साशंकच होतो पण भाऊसाहेबानी पन्नास पाऊणशे गोष्टी काळजीने वाचल्या, निवडल्या, नाव सुचवले 'जिव्हाळा' व सविस्तर आणि चांगली अशी प्रस्तावना लिहून दिली. व त्याने भाऊसाहेबांचा व माझा जिव्हाळाही वाढला. दुसरी भाग्याची गोष्ट म्हणजे, कृष्णराव मालपेकरांच्यामुळे मला दामोदर सावळाराम यंदे हेही प्रकाशक लाभले! अशा रीतीने! 'जिव्हाळा' हा लघुकथासंग्रह बाहेर पडला. भाऊसाहेबांच्या प्रस्तावनेमुळे त्या संग्रहाला दर्जाही प्राप्त झाला. भाऊसाहेबांच्यामुळे मला साहित्यिक








म्हणून मान्यता मिळाली. यानंतर चांगल्या मान्यवर व्यक्तींचे व प्रसिद्ध मासिके व वर्तमानपत्राचे खच्चून अभिप्राय मिळाले. व साहित्यिकांच्या नामावलीत माझा सनदशीरपणे प्रवेश झाला. मी साहित्यिक नाही असे कोणी म्हणू लागल्यास हा सर्व पुरावा पुढे करून सिद्ध करण्याची पात्रता माझे अंगी आली.

याला सर्वस्वी कारण भाऊसाहेब खांडेकर हे होत. अशा रीतीने भाऊसाहेबांनी माझ्या जीवनात प्रवेश केला ते त्यांचे स्थान माझे जाणेयेणे वेळेअभावी व प्रकृतीमुळे कमी झाले तरी आज ता. १ मे १९६६ पर्यंत तरी कायम आहे. आणि त्या देव्हाऱ्यातून त्या मूर्तीचे कधीही उच्चाटन झाले नाही. त्यानी असा जीवनात प्रवेश केल्यानंतर जीवनाचे अनेक विभाग त्यानी व्यापून टाकले. त्यांचे मला प्रेम मिळाले. प्रेमामुळे मैत्री निर्माण झाली. मैत्रीमुळे खासगी तसे सार्वजनिक जीवनात साहाय्यक व सल्लागार बनले. नेहमीच्या सहवासामुळे घरोबा वाढला. घरच्या सुखदुःखाच्या गोष्टी बोलण्याइतका जवळचा संबंध आला. वैचारिक मतभेदामुळे काही दुरावा निर्माण झाला नाही.

भाऊसाहेब प्रत्यक्ष राजकारणात सहभागी झाले नाहीत. ते शक्यही नव्हते. त्यांनी आपल्या जीवनाचा मार्ग आखून ठेवला होता. तरी मला त्यांचा वैचारिक पाठिंबा व सहानुभूती मिळू शकली. त्यांच्याशी मी विचारविनिमयही करीत होतो. माझ्या 'अखंड-भारत' पत्राचे उद्दिष्ट राजकीयच होते. ते सरकारच्या डोळ्यात खुपत होते. पुढे त्याच्यावर गंडांतर आलेही. त्यातून सरकार विरोधी प्रचार उघड उघड होत होता. राजशाही विरुद्ध लोकशाही हा झगडा त्या पत्रद्वारे चालला होता. मला माझ्या प्रमुख जातभाईंचा व पत्रांचा विरोध होता. तरी त्या पत्राशी भाऊसाहेबांनी उघड सहकार्य दिले.

आचार्य जावडेकरांनी अखंड-भारताचे सह-संपादकत्व पतकरले तर भाऊसाहेबांनी त्यावर साहाय्यक म्हणून नाव देण्यास संमती दिली व दर आठवड्यास विनामूल्य लेख देण्यास सुरवात केली. या दोघांच्या सहकार्यामुळे माझ्या साप्ताहिकाचा दर्जा व खपही वाढला. ते पत्र केवळ स्थानिक राहिले नाही.

मी तुरुंगात पडलो. सक्त मजूरीची शिक्षा झाली. बेड्या पडल्या. माझ्यावर राजद्रोहाचा शिक्का पडला. अशावेळी सरकारच्या भीतीमुळे माझे आप्त, भाऊबंद किंवा स्नेही म्हणून घेणारेही मला भेटायला कचरत असत; पण भाऊसाहेब हे पन्हाळ्यावर माझ्या घरच्या मंडळींबरोबर वेळोवेळी भेटायला येत व वाचायसाठी काही तरी पुस्तके आणून देत. घरच्या मंडळीत मी भाऊसाहेबांचा समावेश करीत आलो आहे.

त्यांचे माझ्यावर प्रेम होते तसे त्यांना माझ्याबद्दल अभिमान वाटे. त्यानी आपल्या आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या सर्व पुस्तकांच्या वेळोवेळी भेटी दिल्या व आपले एक पुस्तकही मला प्रेमाने अर्पण करून माझा बहुमान केला. एका साहित्यसम्राटाने केलेला हा गौरव म्हणजे माझ्या आयुष्यातील मोठी अभिमानास्पद गोष्ट मी मानतो.

मीही कृतज्ञताबुद्धीने माझा दुसरा लघुकथासंग्रह संसार त्याना अर्पण करू शकलो.

त्यांनी माझ्या एकसष्ठावीच्या निमित्ताने १९५६ जूनच्या किर्लोस्कर मासिकाद्वारे अखिल महाराष्ट्रीयांना आपल्या लेखणीचे द्वारे ओळख करून दिली. तो त्यांचा लेख मी अनेकवेळा उद्धृत केला आहे. माझे सारे जीवन आणि कर्तृत्व त्यात त्यानी सहानुभूतीच्या ओलाव्यात ओतले आहे.

भाऊसाहेबांच्या मैत्रीत कसलाच वरपांगीपणा नाही. ती मैत्री अंतर्बाह्य शुद्ध आहे. माझ्या जीवनात आलेल्या अनेक कटु अनुभवात ती सात्विकतेने उठून दिसते. त्याना माझ्यापासून काही मिळवायचे नाही, काही मिळवण्याजोगे नाही.

माझ्या आत्मचरित्रालाही त्यांनी प्रस्तावना लिहिली आपल्या 'मंगलवाचन' या शालेय पुस्तकात माझा लेख घेतला आहे. सर्वात मोलाची गोष्ट म्हणजे त्यानी आपल्या हृदयात मला करून दिलेली जागा ही होय.

भाऊसाहेब हा माझा विसावा आहे. भाऊसाहेब म्हणजे माझे ग्रंथभांडार ! निराळ्या वाचनालयात जायला नको. त्याच्या धबधब्याप्रमाणे वाहत्या ज्ञान-गंगेत ती पोहून जातो. राजकारण असो, साहित्य असो, समाजसेवा असो, अगर शैक्षणिक विषय असो कोणताही विषय काढला की भाऊसाहेब रंगून जातात. आणि त्या रंगपंचमीत दुसरे पण न्हाऊन जातात !

ते सदा रोगी पण बोलू लागले की आपण आजारी आहोत हे केव्हाच विसरून जातात.








विद्यार्थ्यांना साहाय्य करणे हा भाऊसाहेबांचा धर्म. निर्मळ सत्शील चारित्र्य म्हणजे भाऊसाहेब. जीवनासाठी कला हे त्यांच्या साहित्याचे ध्येय. ते साहित्य कौशल्याने रंगवणे यासाठी ते आटापीट करतात ! ते मानवतावादी मार्क्सिस्ट आहेत.

× × ×

## (३) काकासाहेब गाडगीळ

पुण्याला जाण्याकरता म्हणून मी मिरजेच्या स्टेशनवर उतरलो. बंगलोरची गाडी अद्याप यायची होती. साहजिकच सामान टाकून इकडे तिकडे फिरू लागलो, तर प्लॅटफार्मच्या दगडी फरशीवर होल्डॉल टाकून दोन गृहस्थ गप्पा मारत बसले होते. एक तरुण होता दुसरे गृहस्थ वृद्ध होते. काहीतरी विनोद करून हसत होते. तो प्लॅटफार्म म्हणजे स्वतःच्या घराचाच व्हरांडा जणू. आपल्या अवती भोवती कोण आहेत किंवा आपल्याकडे कोण पहात असतील याचा त्या वृद्धाला विचारही शिवलेला दिसत नव्हता. बोलण्यात वागण्यात किंवा तेथे तसे त्या वळकटीवर बसण्यात त्याना जराही संकोच वाटत असलेला दिसला नाही. तसे बसण्यात आणि बोलण्यात त्याना विशेष असे काही वाटत होते असे दिसले नाही. इतर जी सामान्य माणसे तेथे बसली होती त्याहून आपण काही निराळे आहोत, असामान्य पैकी कोणीतरी एक व्यक्ती आहोत असे वाटले असते तर ते फर्स्ट क्लासच्या वेटिंग रूममध्ये साहजिकच बसले असते.

पण तसा त्यांचा पोषाखही नव्हता. किंवा काही इतमामही नव्हता. कपडे खादीचे होते. पण सर्वोदयी छापाचे नव्हते. लुंगी, मुंड वाढलेली दाढी, हातात चरख्याची पेटी वगैरे त्यानी ध्येयनिष्ठ खादीभक्त पुढाऱ्याचा सरंजाम केलेला नव्हता. किंवा तेथे मांड घालून ते चरखा चालवत बसले नव्हते.

विलायती बॅरिस्टरी रुबाब तर नव्हताच पण गांधी-कल्टचे प्रदर्शन करणारा अवतार नव्हता. सर्वसामान्य चारचौघात मोडणारी अशी व्यक्ती दिसत होती.

माझे लक्ष जाण्याचे कारण त्या गृहस्थाच्या पाठमोरी काही माणसे त्या गृहस्थाकडे बोट दाखवून काहीतरी आपापसात कुजबुजत होती. त्यात एक प्रकारचा आदर दिसत होता. तो त्या कुजबुजणाऱ्यांच्या चेहऱ्यावरून आणि हावभावावरून मला दिसत होता. तेव्हा माझी ही जिज्ञासाबुद्धी जागी झाली व मी त्या वृद्ध गृहस्थाला पाहण्याकरता त्यांच्या समोरच्या बाजूला गेलो आणि निरखून पाहू लागलो. तरी ती व्यक्ती निव्वळ पाहिलेलीच होती असे नव्हे तर चांगल्या ओळखीची, निकट परिचयाची, घरोब्याची आढळून आली. ती प्लॅटफार्मवर होल्ड ऑल टाकून अगदी सामान्यात सामान्य माणसाप्रमाणे गप्पा गोष्टी करीत बसलेली पाहून मी खजील झालो. त्या त्यांच्या वागणुकीने मी अंतर्मुख झालो. विचार करू लागलो. मी स्वतः या वृद्धाच्या मानाने किती लहान. विद्वत्ता, मोठेपणा, भोगलेली सत्ता, ऐश्वर्य, लोकप्रियता याशी तुलना केली म्हणजे मी किती लहान. पण मी असा संकोच टाकून वळकटीवर गप्पा मारीत बसलो असतो का ?

त्या वळकटीवर त्यांचे बसणे, ही एकच गोष्ट त्यांचे व्यक्तिचित्र लिहायला पुरेशी आहे.

हा असामान्य माणूस सामान्यात एकरूप कसा होतो हे पाहणे म्हणजेच एक शिक्षण नव्हे काय ?

बुद्धांनी राज्यपद टाकून सामान्य जनतेची सेवा करण्याकरता स्वतःला वाहून घेतले.

आपण ऐकतो आणि सोडून देतो. पण हिंद सरकारचे मंत्रिपद भोगल्या नंतर, राज्यपाल होऊन राजेशाही इतमामात राहिल्या नंतर, आणि एका प्रांताचा पुढारी म्हणून जनतेने शिक्का मोर्तब केल्यानंतर पुनः स्वखुषीने मानपानाचा त्याग करून सामान्याची सेवा करण्याकरता उर्वरित आयुष्य घालवण्याचा निर्धार करणारी व्यक्ती असामान्य नव्हे काय ? त्यांची पत्नी वारल्यानंतर माझे एक परमस्नेही त्यांना भेटायला गेले होते ते म्हणाले, ' माझी व काकांची दोन तपाची ओळख. काका सामान्यातून चढत मध्यवर्ती सरकारचे मंत्री झाले, राज्यपाल झाले पण त्यांच्या घरात बदल झाला नाही, फर्निचरमध्ये बदल झाला नाही की पोषाखात बदल झालेला मी पाहिला नाही. त्यांच्या आर्थिक स्थितीतही बदल झाला नाही. त्यांच्या पत्नी, स्टोव्ह पेटल्यामुळे त्यांत सापडून वारल्या, तो स्टोव्ह दुरुस्तीसाठी त्या स्वतः दुकानात गेल्या होत्या.

कोण त्यागी आणि सत्वशील जीवन हे !

ही वृत्ती हाडीमाशी मुरली होती म्हणून आमचे न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ सामान्य माणसाप्रमाणे मिरज स्टेशनच्या प्लॅट-फॉर्मवरच्या फरशीवर वळकटी टाकून सामान्य उतारूत बसून गप्पा मारीत

होते. जणु आपल्या जीवनाचे तत्त्वज्ञान त्या वळकटीत गुंडाळून त्याची राखण करीत होते.

काका एवढे मोठे खरे पण ते सर्वांना आपले काकाच वाटत. ज्यांची ज्यांची म्हणून काकांची ओळख झाली त्यांचे ते एक कुटुंबीय झाले. स्वातंत्र्यलढयातील लढाऊ कार्यकर्त्यापासून ते स्वतंत्र भारताच्या मध्यवर्ती सरकारचे मंत्रिपदापर्यंत ते जरी चढले तरी ते सर्वांना आपले घरचे काकाच वाटत. त्याना सत्तेचा मद कधीच चढला नाही, तसे तुरुंगवासालाही ते कधी डगमगले नाहीत. ती यात्राही त्यानी अनेक वर्षे केली.

ध्येयनिष्ठा, कष्ट, त्याग यातूनच जीवनाला सुरवात झाल्यामुळे सत्ता व ऐश्वर्याच्या शिखराला पोचल्यानंतरही ते सत्तेच्या व संपत्तीच्या मोहात गुरफटून गेले नाहीत. त्यांनी इमले उठवले नाहीत व कोट्यधीश बनले नाहीत. आज तरी मोठेपदावर चढलेल्यात असे निर्मल चारित्र्य मिळणे दुरापास्त झाले आहे. काकांच्या चारित्र्यावर शत्रूलाही शिंतोडे उडवता येणार नाहीत.

महाराष्ट्रातील पांढरपेशा समाजाला गांधीवादी काँग्रेसकडे, ज्या त्रयमूर्तींनी आपल्या त्यागाने, श्रमाने व कष्टाने खेचून आणले त्या त्रयमूर्तींत काकांचे स्थान, शंकरराव देव व केशवराव जेधे यांच्या बरोबरचे आहे.

टिळक आणि आगरकर या दोघांचेही गुण, निष्ठा, निर्भयता व धडाडी काकांच्यात एकवटली होती. काका राजकीय दृष्टया तसे सामाजिक दृष्टयाही पुरोगामी होते. त्यामुळे आम्हा बहुजन समाजातील कार्यकर्त्यांचे प्रेम व विश्वास संपादन करू शकले. म्हणूनच टिळकांना विरोध करणारा ब्राह्मणेतर समाज त्यांना आपलासा करून घेता आला व केशवराव जेध्यांचे ह्रदयही ते जिंकू शकले. व जेधे गाडगीळ ही जोडी महाराष्ट्रभर गाजली. त्यांनी हातात हात घालून काँग्रेसच्या अनेक निवडणुका जिंकल्या. या दोन व्यक्ती देहानेच फक्त निराळ्या दिसल्या तरी मनाने व ह्रदयाने एकरूप झाल्या होत्या व वैचारिक मतभेद निर्माण होऊन सुद्धा त्यांचे मैत्रीचे संबंध आजन्म टिकून राहिले ते जवळ जवळ एकत्र कुटुंबीयच बनले होते. मला माहीत आहे, वैचारिक मतभेदामुळे केशवरावांनी काकांचेवर वाटेल तसे तोंडसुख घ्यावे पण काकांनी चकार शब्दानेही त्याना उलट जाब देऊ नये. कारण त्या रागामागे केशवरावांचे अंतःकरणात काकांच्या विषयी वाहणारा निर्मळ झरा त्यांना जाणवत होता. आज तर त्या दोघांच्या मैत्रीला ऐतिहासिक स्वरूप प्राप्त झाले आहे. पुण्यातल्या त्या पिढीतील पांढरपेशा समाजातील कोणाही व्यक्तीने बहुजन समाजाचे प्रेम काकांच्या इतके कोणीही संपादन केलेले मला माहीत नाही.

काकांचे माझे जवळ जवळ दोन तपाहूनचे अधिक संबंध, राजकीय सामाजिक तसे कौटुंबिक ज्ञानाने, अनुभवाने, कर्तृत्वाने संपादन केलेल्या सत्तेने, तसेच साहित्य सेवेने माझ्याहून कितीतरी मोठे पण वयाने मात्र अगदी बरोबरचे– त्यांचा तसा माझा एकाच साली जन्म १८९६.

अधिक जवळचे संबंध आले ते कोल्हापुरच्या राजकीय चळवळीमुळे. काँग्रेसचे त्यावेळचे पुढारी संस्थानी चळवळीत भाग घेण्यास राजी नसत. गांधीजींनी संस्थानाचा प्रश्न हाती घेतला नव्हता. पण काकांनी संस्थानी कार्यकर्त्यांच्या हाकेला लगेच ओ दिली.

काकांना बोलवायचे किंवा केशवरावांना बोलवायचे म्हणजे एकस्याला बोलावून चालत नसे. दोघांची जोडी ही तेथे असायलाच पाहिजे. म्हणून कोल्हापूर प्रजापरिषदेच्या गारगोटी येथील अधिवेशनासाठी काकांना अध्यक्ष म्हणून बोलावताना केशवरावांना उद्घाटक म्हणून आम्ही बोलावले होते ते २४ मे १९४७ ला.

कसल्याच सत्तेवर नसलेल्या निष्कांचन मनुष्याला अशी आपुलकी कोण दाखवतो ? संयुक्त महाराष्ट्र चळवळीत मी पहिला सत्याग्रही-सेनानी म्हणून म्हैसूर स्टेटमधील मंगळूरच्या सब जेलमध्ये होतो. तेथे मी आजारी पडल्याची वार्ता कानावर पडताच काकानी चंदीगडहून जेल पत्त्यावर तार करून माझ्या प्रकृतीची चौकशी केली. आणि ते तर त्यावेळी पंजाबचे राज्यपाल होते. तेथे तुरुंगात मला वाचण्याकरता म्हणून, स्वतः अनुवादित केलेला जीपजी साहेब हा ग्रंथ भेट म्हणून पाठवला. आणखी काही पुस्तकांची भेट यापूर्वीही त्यांनी दिली होती.

मी नुकत्याच ( १९६५ साली ) प्रसिद्ध केलेल्या लघुकथा संग्रहाची त्यांनी प्रशंसा केली. माझ्या सत्तरावी निमित्त पाठवलेल्या लेखात माझा निःसंकोच गौरव केला. ते सर्टिफिकेट बाळगण्यास मला अभिमान वाटतो. ते लिहितात– ‘ गेल्या चाळीस वर्षांवर








माधवरावनी जनतेची सेवा केली आहे. आणि त्या कामी त्यांचा अनन्वित छळ झाला आहे. त्यांना त्याग करावा लागला आहे. त्यांच्या अनेक आशा आकांक्षा धुळीस मिळाल्या आहेत. कोल्हापूरच्या प्रजेच्या हक्कासाठी केलेल्या प्रयत्नांचा लिहिला गेलेला इतिहास त्यांच्या उल्लेखाशिवाय पुरा होणारच नाही. ते बाहेर असोत तुरुंगात असोत त्यांची निष्ठा अखंड व तेजस्वी राहिली आहे. गरीब जनतेच्या मागण्यांचा पाठपुरावा करणाऱ्याला त्या काळात राजक्रोधाला बळी पडावे लागे. तथापी माधवरावजी यांनी आपले काम चालूच ठेवले. आता ते वयोवृद्ध झाले आहेत. तथापी आपल्या अनुभवाचा फायदा तरुण कार्यकर्त्यांना द्यावा अशी सर्वांची इच्छा असणार–

पुणे विद्यापीठ २९-४-१९६५. न. वि. गाडगीळ.

काका अत्यंत स्पष्टवक्ते. त्यांच्यात आत बाहेर असे काही असायचे नाही. आपले विचार प्रिय वाटोत, अप्रिय वाटोत त्यांची कदर न करता स्वतःला प्रामाणिक वाटणारे विचार ते स्पष्ट बोलत. पक्षात राहून पक्षाच्या दोषावर प्रहार करीत, त्यासाठी पक्षातील कोणी श्रेष्ठी रागावले तरी त्याची पर्वा करीत नसत–सत्तेच्या किंवा लोभात ते केव्हाच गुंतून पडले नाहीत. त्यामुळे त्यांच्या विचाराची व मताची कुचंबणा त्यांचे हातून केव्हाच झाली नाही. पक्षशिस्तीहून सत्याच्या शिस्तीला, पक्षनिष्ठेहून देशनिष्ठेला त्यानी महत्व दिले. त्यामुळे पक्षदोषावर पांघरूण घालू इच्छिणाऱ्या पुढाऱ्यांना ते अप्रिय झाले. पण त्यांच्यावर पैशाच्या, लोभाचा अगर शीलभ्रष्टतेचा आरोप शत्रूलाही करता आला नाही. शिळोप्याच्या कुटाळक्यातही त्यांच्या चारित्र्यावर टीका करता आली नाही. सत्तेचा व मानाचा लोभ असता तर जनसेवेकरता, आपल्याला पटेल ते बोलण्याकरता त्यानी राज्यपालपद टाकून आपल्या घरभाड्यावरच गुजराण का केली असती?

सत्य आणि कटु बोलणारा नेहमीच अप्रिय ठरतो म्हणून ते अनेकांचे नावडते झाले. पण समाजाच्या व पक्षाच्या शुद्धीकरणासाठी अशाच माणसांची आवश्यकता असते.

बहुतेक सर्व पक्षीयांत आणि पुढाऱ्यांत आढळणारा पक्षाबद्दलचा दुरभिमान काकांच्यात आढळत नव्हता. विरोधी पक्षांनीसुद्धा जनतेच्या योग्य प्रश्नावर भरवलेल्या सभेचे अध्यक्षपद स्वीकारण्यास काका डगमगायचे नाहीत, तसेच विरोधी पक्षातील व्यक्तींशी व्यक्तिविधायक मैत्री व संबंध ठेवण्यास ते कधी कचरले नाहीत. इतर पक्षांत असलेल्या गोरे व एस. एम. ना ते आपल्या कुटुंबियांप्रमाणेच समजत. पक्षबंधनामुळे त्यांनी आपली माणुसकी गमावली नाही. व्यासपीठावरचे राजकीयविरोधी व्यासपीठावरून खाली येताच घरी चहापाण्याला बसले आहेत.

काँग्रेसमध्ये राहूनही ते जनतेला इशारा देऊ शकतात. आता जनतेचे राज्य सुरू झाले आहे याचा अर्थ सर्व काही चांगले आहे असे नाही. माणसाला जशी पडछाया त्याप्रमाणे आधुनिक राज्यामध्ये भ्रष्टाचार, अकार्यक्षमता, अन्यायाची वागणूक ही मिळतच असते. म्हणून जनतेने जागृत राहिले पाहिजे. जनतेचे स्वातंत्र्य व अधिकाराची व सत्तेची लालसा यांच्यात अखंड लढा इतिहासकालापासून चालूच आहे. हा लढा चालू ठेवण्याचे कार्य काकासाहेबानी मरण कालपर्यंत चालू ठेवले होते.

काका राजकीय लढवय्ये होते. अनेकवेळा कारावास भोगला. महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस संघटक व अध्यक्ष म्हणून अनेकवर्षे होते. काँग्रेस कार्यकारिणीचे सभासद, काँग्रेस पक्षाच्या मध्यवर्ती विधिमंडळाचे प्रतोद, केन्द्र मंत्रिमंडळात मंत्री, पंजाबचे राज्यपाल– व अखेर पुणे विद्यापीठाचे कुलगुरु – अशा अनेक महत्त्वाच्या जागा काकांनी भूषविल्या. पण काकांच्या आर्थिक स्थितीत बदल झाला नाही. त्यांनी इमले उठवले नाहीत की बँकबुके भरली नाहीत. ते सामान्य माणूसच राहिले.

साहित्यातील काकांची कामगिरीही तशी उल्लेखनीय आहे. ललित साहित्य, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र या विषयांवरही त्यांनी अनेक पुस्तके लिहिली आहेत. मराठी साहित्यावरही ते कायमची छाप ठेवून गेले. याही सेवेमुळे साहित्यप्रेमी जनतेने त्यांचा गौरव केला. त्यांना साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचाही मान मिळाला.

ता. १२ जानेवारी १९६६ ला काकासाहेब आकस्मिकरित्या सर्वांना दुःखात लोटून परलोकी गेले. महाराष्ट्रातील एक सत्त्वशील, निर्भय आणि निभीड अष्टपैलू जीवन नाहीसे झाले.










# पुस्तक परीक्षण–

(१)

**विदर्भ संशोधन मंडळ, वार्षिक १९६५; संपादक प्रा. भ. श्री. पंडीत; किंमत ५ रुपये. प्रकाशक विदर्भ संशोधन मंडळ नागपूर– १.**

विदर्भ संशोधन मंडळाचे इतिहास, भाषा व साहित्य या संबंधाचे संशोधन व समीक्षा हे कार्य धिम्मेपणे प्रगती करीत आहे, ह्याचा हा वार्षिक अंक उत्तम निदर्शक आहे. नाग–विदर्भातील व एकंदर महाराष्ट्रातील विद्याव्यासंगी व्यक्तींच्या संशोधनाचे प्रयत्नाना योग्य अवसर मंडळाने दिला आहे. विविध मासिकांमध्ये संशोधनात्मक एखादा लेख प्रसिद्ध होणे निराळे आणि संशोधनाला वाहिलेल्याच नियतकालिकातून संशोधनास प्रसिद्धी मिळणे हे निराळे होय. अशा नियतकालिकांमध्ये प्रसिद्ध झालेल्या संशोधनास लुप्त होण्याचे भय कमी असते. ते ग्रंथालयात स्थिरपणे शाबूत रहाते.

या वार्षिकामध्ये संग्रहित केलेले सगळेच लेख काही नवीन कमीजास्त महत्त्वाच्या कल्पना व गोष्टी सांगत आहेत. डॉ. वा. वि. मिराशी यांचा पहिलाच लेख शक वंशाच्या राज्यविस्ताराची वाढलेली कक्षा दाखवून देतो. कुशाणांचे राज्य नाशिकच्या परिसरात होते याबद्दल इतिहास संशोधनाच्या पहिल्या कालखंडातच निर्णय झाला होता. या लेखाने ते विदर्भावरही होते हे भंडारा जिल्ह्यातील वैनगंगेच्या तीरी असलेल्या पौनी गावातील महाक्षत्रपरूपी अम्म याच्या स्तंभलेखावरून सिद्ध करण्याचा यशस्वी प्रयत्न डॉ. मिराशींनी केला आहे. डॉ. ग. त्र्यं. देशपांडे यांचा 'प्रगृह्य' या पाणिनीय परिभाषेवरील व श्री. म. दा. साठे यांचा संस्कृतातील उपसर्गांवरील लेख हे व्याकरणविषयक विचारामध्ये उद्बोधक चर्चेची भर घालणारे आहेत. वैदिक साहित्यात उपसर्ग हे स्वतंत्र पदांप्रमाणे वापरलेले दिसतात. याची दखल घेऊन उपसर्गांची चर्चा अधिक उद्बोधक ठरली असती. उपसर्गांना प्रारंभी संस्कृत भाषेत वाचकता असावी व हळुहळू ही वाचकता लुप्त होऊन द्योतकता कालांतराने प्राप्त झाली असावी अशी भाषिक ऐतिहासिक उपपत्ती (Semantics) स्वीकारता येणे शक्य आहे. श्री. देशपांडे यांचा लेख इंग्लिशमध्ये आहे. रसोपपत्तीमध्ये नवीन भर घालणारा डॉ. स. अ. डांगे यांचा लेख आहे. ऋग्वेदातील सोमरसविषयक ऋचांच्या समीक्षेवर आधारलेली ही साहित्यशास्त्रातील रसकल्पनेसंबंधीची अभिनव ऐतिहासिक उपपत्ती आहे. सकृद्दर्शनी सोमरसाचा साहित्यरसाशी लावलेला हा दूरान्वय आहे असा आक्षेप घेता येईल; परंतु या लेखाचे अधिक मनन केल्यास त्याची यथार्थता ध्यानात भरते.

(२)

**संशोधन मुक्तावलि– (सर ५ वा) ले. वा. वि. मिराशी प्रकाशन–विदर्भ संशोधन मंडळ नागपूर–१.**

सतत ४० पेक्षा अधिक वर्षे विद्याव्यासंग करीत भारताच्या प्राचीन इतिहासामध्ये अखंड रीतीने नवीन नवीन संशोधनाची भर घालून या प्राचीन इतिहासाचे भूतकालाच्या अंधारात गडप झालेल्या ऐतिहासिक घटना व ऐतिहासिक कालखंड मानवी ज्ञानाच्या प्रकाशात आणण्याचे महनीय कार्य डॉ. मिराशी यांनी चालविलेले आहे. याचे हे आणखी नवे प्रत्यंतर होय. कालिदास व भवभूती यांच्या संबंधाचे वादविवाद कित्येक वर्षे मिराशींचा पिच्छा पुरवित आहेत परंतु मिराशी या वादविवादाला पुरून उरले आहेत. एवढेच नव्हे तर डॉ. पां. वा. काणे यांच्यासारख्या दिक्गजांशीही सामना करीत असता ते यशस्वी होत आहेत याचेही प्रत्यंतर या मुक्तावलीवरून मिळते. शिलालेख व ताम्रपट यांचे गहन विद्यारण्य सुगम करण्याचे महान कार्य करीत असता डॉ. मिराशींनी अखिल भारतीयच नव्हे तर आंतरराष्ट्रीय कीर्ती कशी मिळविली आहे, याचेही उत्कृष्ट प्रमाण या पाचव्या सरामध्ये मिळते. महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाच्या दृष्टीने अत्यंत अमोल अशी शिलाहार राजवंशाची समग्र कथा या सरामध्ये ग्रथित केलेली आहे. महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासग्रंथांमध्ये अविस्मरणीय असे स्थान यामुळेच या सराला प्राप्त झाले आहे.

प्रा. शेंबवणेकर यांचे गजानन पूजेबद्दलचे ऐतिहासिक संशोधन नवभारत मासिकात प्रसिद्ध झाले आहे व त्यावरील मिराशी यांचीही टीकाटिप्पणी त्यानंतर प्रसिद्ध झाली आहे तिचा संग्रह या सरामध्ये केला आहे. यासंबंधी आग्रहास अजून थोडी शंका शिल्लक राहिली आहे. कृष्ण यजुर्वेद शाखेतल्या नारायण–








उपनिषदात दुर्गा इत्यादि देवतांचे मंत्र आहेत त्यातील गजाननाचे वर्णन करणारा मंत्र असा आहे–

तत्पुरुषाय विद्महे वक्रतुण्डाय धीमहि ।

तन्नो दन्तिः प्रचोदयात् ॥ ( नाउ. १।५ )

नारायणोपनिषदाचा विशेषतः त्यातील या विविध देवताविषयक मंत्रांचा काळ अलीकडचा असावा असा आक्षेप घेणे शक्य आहे. या आक्षेपाचे निरसन असे करता येते की नारायण उपनिषद हे सद्यःस्वरूपात आपस्तंब व हिरण्यकेशी गृह्यसूत्रांच्या अगोदर म्हणजे इसवीसनापूर्वी अस्तित्वात आले असावे. कारण नारायणोपनिषदाचे अनेक कर्मकांडविषयक व मंत्रविषयक संदर्भ या गृह्यसूत्रांमध्ये घेतलेले आहेत. ही गृह्यसूत्रे द्रवीड देशात निर्माण झालेली असल्यास गणेश देवता द्रवीड देशात किंवा दक्षिणापथातच प्राचीनकाली दीर्घकालपर्यंत राहिली व कालिदासोत्तर कालात तिने उत्तरापथात प्रवेश केलेला असावा.

या पुस्तकाच्या परिशिष्टात डॉ. वा. वि. मिराशी यांच्या संशोधनपर ग्रंथांची व लेखांची समग्र सूची दिलेली आहे. या सूचीचा उपयोग प्राच्यविद्या संशोधकाला चांगला करता येईल.

– लक्ष्मणशास्त्री जोशी

—





अनुक्रमणिका








# सार-संकलन

## रुपयाचे अवमूलन

रुपयाचे अवमूलन आज ना उद्या करावेच लागले असते. परंतु ३७ टक्क्याने अवमूलन करणे म्हणजे धाडसी कृत्य म्हटले पाहिजे. कारण जागतिक बँकेतील अगदी सनातनी नाणेशास्त्रज्ञांनासुद्धा त्याचे आश्चर्य वाटले असेल असे वाटते. भारताला मिळणारे ३५० कोट पौंडाचे कर्ज आयात महाग केल्याखेरीज व निर्यातीतील चढाओढ कमी केल्याखेरीज मिळणार नव्हते हे सर्वास माहीत होते. परंतु आयातीवर कर बसवून किंवा निर्यातीला सरकारी मदत देऊन हा उद्देश साधता आला नसता असे नाही. विशेषतः राजकीय दृष्टया अस्थिर असलेल्या निवडणूकपूर्व वर्षाकरता, अमेरिकेने सुद्धा ते मान्य केले असते. परंतु एकदम धडाडीचा निर्णय घेऊन भारतीय राजकारणात इंदिरा गांधींनी नवे पर्व सुरू केले आहे.

तांत्रिकदृष्टया अवमूलनाचे समर्थन करणे फारच सोपे आहे. रुपयाच्या किंमतीवर चालू असलेल्या सट्टाबाजीस आळा घालण्याचा तो अत्यन्त कडक उपाय होता. त्याचे राजकीय परिणाम लक्षात घेऊनही भारतीय पंतप्रधानांनी तो उपाय योजला याबद्दल त्यांना पूर्ण मार्क दिले पाहिजेत. काँग्रेस पक्षात सुद्धा या निणर्याचे स्वागत न होता त्या विरुद्ध कुरबूर चालू आहे. काँग्रेस पक्षाची निवडणुकीतील मते या निर्णयाने पुष्कळ कमी होतील असे श्री. कामराज यांचे मत आहे. व्यापारी वर्गात पण असंतोष आहे. गेल्या अठरा महिन्यात मालाच्या व मजूरीच्या किंमती भरमसाट वाढत आहेत. आयात होणाऱ्या मालावर व परदेशी बड्या तंत्रज्ञावर देशातील उद्योगधंद्यांना अवलंबून रहावे लागत असल्यामुळे चलनवाढ अफाट होईल की काय याचीही भीती वाटत आहे. आपल्या घरच्या बाजारपेठेवर अवलंबून असलेल्या परदेशी कंपन्यांना चांगलाच तडाखा बसेल. घरी पाठवाव्या लागणाऱ्या नफ्यात ५८ टक्क्यांनी वाढ होईल. चहाच्या ब्रिटीश कंपन्या, चहा नेहमीच पौंडाच्या भावात विकतात त्यामुळे त्यांचा फायदा होण्याची शक्यता होती. परंतु अशा कंपन्यांवर प्रत्येक किलोग्रॅममागे २ रुपये याप्रमाणे कर बसविण्यात आलेला आहे. व त्यामुळे लंडनच्या बाजारपेठेत चहाच्या शेअर्सचे भाव बरेच घसरले आहेत.

परंतु श्रीमती गांधी व त्याच्या मंत्रिमंडळानी या सर्वाचा विचार केलाच असला पाहिजे. अवमूलनाने परदेशी मदतीत पुष्कळ वाढ होऊन येथील उद्योगधंद्याला व कारखानदारीला स्थैर्य येईल अशी खात्री वाटल्यामुळेच त्यानी हा निर्णय घेतला असे वाटते. अवमूलन करताना तीन गोष्टी गृहीत धरल्या गेल्या असल्या पाहिजेत. एकतर यंदा पाऊस पाणी भरपूर येऊन अन्नधान्याची टंचाई कमी होईल. केरळात पावसाला सुरवात झाली असून सर्वत्र चांगला पाऊस होईल असे हवामानतज्ञांना वाटत आहे. दुसरे म्हणजे वस्तूंची कमतरता असल्यामुळे व्यापारीवर्ग त्यावर जास्त नफा मिळवीत आहे व त्यामुळे 'कॉस्ट ऑफ लिव्हिंग' वाढत आहे. त्यामुळे भरघोस पीक व परकीय मदतीमुळे वाढणारे उत्पादन यांच्या साहाय्याने किंमती कमी करता येतील. व तिसरे म्हणजे निर्यातीवर लादलेल्या करातून परदेशातून आणाव्या लागणाऱ्या अन्नधान्य, खते व तेले याना लागणारा पैसा इतर नव्या कराचा बोजा जनतेवर न लादता उभा करता येईल. परदेशी मदतीचा काही भाग अत्यंत जरूर असलेल्या कापूस, खोबरे किंवा इतर जरूरीच्या वस्तु घेण्यात खर्च करण्याचा पण त्यांचा इरादा आहे.

परंतु ही सर्व तुजबी कारणे आहेत. अवमूलनाने मुख्यत्त्वेकरून भारतीय आयात कमी होऊन निर्यात वाढण्यास मदत होणार आहे. काही महत्त्वाची मशीन्स किंवा कच्चा माल आणण्यास सरकार मदत करणार असले तरीसुद्धा त्याच्या किंमती जास्त असल्यामुळे देशातील मालाचा जास्तीत जास्त उपयोग करण्याची प्रवृत्ती वाढीस लागेल. मोठमोठी यन्त्रसामुग्री परवान्याशिवाय परदेशातून आणता येणार नाही. व परवाने देण्याचे धोरण देशी धंद्याला संरक्षण देणारे राहील.



अनुक्रमणिका

निर्यातीला दोन प्रकारे मदत होणार आहे. जपान किंवा हाँगकाँग त्यांच्यापेक्षा भारतीय मालाच्या किंमती आतापर्यंत जास्त होत्या, त्या अवमूल्यनाने कमी होऊन परदेशात चहा, खनिजे, कापड, सायकली किंवा शिवण्याची यंत्रे यासारखा माल यास परदेशी बाजारपेठ काबीज करण्याची संधी मिळेल. दुसऱ्या बाजूस जो माल तयार करण्यास परकीय कच्च्या मालाची गरज आहे त्याच्या किंमती वाढून, अंतर्गत मागणी कमी होऊन निर्यात करण्याची प्रवृत्ती वाढू लागेल. परंतु किंमती जर भरमसाट वाढू लागल्या तर मात्र अवमूलनाने काहीही फायदा होणार नाही.

अवमूलनाने काय काय गोष्टी होतात हे अजून दिसावयाचे आहे. परंतु आज अनेक कारखान्यांपुढे तातडीचे प्रश्न उभे राहिले आहेत. उभारावयास घेतलेल्या कारखान्यांची रुपयातील किंमत एकदम वाढली आहे. ज्यांचे कारखाने पुढे झाले आहेत त्यांना परदेशी कर्ज फेडण्यास जास्त रुपये पाहिजे आहेत. काही प्रमाणात किंमतीत वाढ होऊन हा प्रश्न सुटेल. भारतामध्ये मालाच्या किंमती ठरविण्याची नवी पद्धती प्रसारात येण्याची पण गरज उत्पन्न झालेली आहे. खुल्या बाजारभावाच्या पद्धतीचा अवलंब करण्यास काहीही हरकत नाही.

चलनाचा चोरटा व्यापार संपूर्ण थांबण्याची आशा कोणालाही नाही. चोरट्या सोन्याला भारतात नेहमीच भाव येईल. परंतु परदेशी चलन व चोरटे सोने यांचे भावही इतके वाढतील की त्यांची मागणीच कमी होऊ लागेल. अवमूलनाचे कितीही फायदे असले तरी त्यामुळे भारताचे सर्व आर्थिक प्रश्न सुटतील अशी आशा करणे व्यर्थ आहे. परंतु पंतप्रधान गांधी व त्यांचे मंत्रिमंडळ अवमूलन हे पहिले पाऊल समजतात. भारताला आर्थिक स्थैर्य मिळवून देण्यास त्यांना अनेक गोष्टी कराव्या लागणार आहेत. बाजारपेठांचा विचार करून त्यांचेवर आधारलेले आर्थिक धोरण स्वीकारल्यास डाव्या गटांना नेहरूंच्या समाजवादी धोरणाचा त्याग केल्याचा आरोप करता येईल. परंतु गांधी सरकारने अवमूलनाचे धडाडीचे धोरण स्वीकारून व परदेशी भांडवल देशात गुंतवण्याकरता योग्य ते वातावरण निर्माण करून आर्थिकव्यवस्था सुधारण्याच्या मार्गाने पाऊल टाकले आहे असे म्हणावे लागते.

औद्योगिक फळी कितीही मजबूत केली तरी भारताचे भवितव्य फार मोठ्या प्रमाणात पावसावर अवलंबून आहे. गांधी मंत्रिमंडळाने आयातीवरील बंधने शिथिल करण्याचे व परदेशी भांडवलाला योग्य तो वाव देण्याचे कबुल केले आहे. या सर्वांमुळे या सरकारला थोडा का होईना पण वेळ मिळाला आहे. या मध्यंतरीच्या वेळात 'भारताला-मदत' ( Aid India )च्या बैठकी पुढच्या महिन्यात होत आहेत. त्यांच्या मदतीने चौथ्या पंचवार्षिक योजनेविषयी नक्की विचार करण्यास पण सरकारला सवड मिळेल. परंतु पुढील वर्षा-दोन वर्षांत फार काय योजनेच्या सर्वच काळात अस्तित्वात असलेले उद्योगधंदे जास्तितजास्त उपयुक्त कसे होतील याकडे लक्ष देऊन शेतीवर जास्त लक्ष केंद्रित करण्याची गरज आहे. पावसावरील शेतीचे अवलंबून रहाणे लवकरात लवकर बंद केले पाहिजे, कमी केले पाहिजे. त्याच प्रमाणे शिक्षणाच्या ब्रिटिश पद्धतीत तांत्रिक शिक्षणाचे महत्त्व झपाट्याने वाढविण्याची पण गरज निर्माण झाली आहे. भारताच्या मंत्रिमंडळाने एक चांगला निर्णय घेतला आहे. असेच अनेक चांगले निर्णय घेण्याची त्यांना बुद्धी होवो. तसे न झाल्यास भारताचे भगवान भले करो असे म्हणावयाची पाळी येईल.

— दि इकॉनॉमिस्ट, लंडन, ११ जून १९६६

## कायदेभंग— उपयुक्त की धोकादायक ?

### कायदेभंग—उपयुक्त

सविनय कायदेभंगाच्या चळवळीस पुन्हा नव्याने महत्त्व प्राप्त होत आहे. जगातील निरनिराळ्या भागातील लक्षावधी लोक त्या मार्गाचा अवलंब करून आपली गाऱ्हाणी समाजापुढे मांडण्यात यशस्वी होत आहेत. दुसरे बाजूस कायदा हे पवित्र बंधन आहे, कायदेभंगात अराजकाची बीजे आहेत, कायदा बदलण्याकरता कायदेशीर पद्धतीचाच अवलंब करावा; शासनकर्त्यांचे ऐकणे प्रत्येक नागरिकाचे कर्तव्य आहे; अशा तऱ्हेची मतेही प्रतिपादली जात आहेत.

या वादाचा संपूर्ण विचार करावयाचा झाल्यास ग्रंथ लिहावे लागतील. सध्या काही विवक्षित वातावरणात व विवक्षित प्रसंगी, कायदेभंगाचा हक्क व कर्तव्य यासंबंधी विचार करण्याचे ठरविले आहे.







कायदेभंगाची व्याख्या, स्वातंत्र्याचा अर्थ, त्याचा नैतिक अनुभवाशी असलेला निकट संबंध व नागरिकांची राजकीय व कायदेशीर जबाबदारी या सर्वांचा विचार करूनच करावी लागेल ' तात्कालिक हितसंबंध लक्षात न घेता, समाजाच्या एखाद्या विवक्षित ध्येयपूर्ती करता, व्यक्तीने वा समूहाने, जाणून बुजून, हिंसात्मक मार्गाचा अवलंब न करता, कायदा मोडणे ' ही सविनय कायदेभंगाची व्याख्या होईल.

कायदा टाळणे व तो मोडणे यातील फरक लक्षात घेतला पाहिजे. कायदा टाळणे स्वतःच्या स्वार्थाकरता जरूर असते. तो टाळल्यामुळे भोगावी लागणारी शिक्षा पण टाळण्याचा प्रयत्न केला जातो. त्या उलट कायदा मोडणारा, काही विवक्षित ध्येयासाठी कायदा मोडतो व त्यामुळे होणारी शिक्षा आनंदाने भोगण्यास तयार होतो. कायदेभंगाचे दुसरे वैशिष्टय म्हणजे, त्यात कोणत्याही तऱ्हेच्या हिंसक मार्गाचा अवलंब केला जात नाही. कायदा मोडताना, जाळपोळ, लुटालुट, किंवा हाणामारी कटाक्षाने टाळली जातात. पुष्कळशा राज्यशास्त्रज्ञांनी हिंसात्मक प्रतिकाराची बाजू घेतली असली तरी राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय तंत्र्यात तो मार्ग क्रांतिचाच मार्ग ठरतो.

माणूस स्वतः बद्दल विचार करू लागून, आपले राज्य आपण चालविण्यास समर्थ आहोत अशी त्याची खात्री झाली म्हणजे त्याला आपण कसे रहावे व वागावे हे प्रश्न महत्त्वाचे होतात. परंतु ज्या समाजात नागरिकांना आपल्या वैयक्तिक व नैतिक जबाबदारीची जाणीव नसते त्यांचेपुढे हे प्रश्न असतच नाहीत. परंतु आपल्या स्वातंत्र्याची व त्यातून निर्माण होणाऱ्या जबाबदारीची जाणीव झाली म्हणजे आपल्या वर्तणुकीवर काही विवक्षित तत्त्वानुसार झाला घालण्याची गरजही निर्माण होते. मनात येईल तसे वागण्यास काहीही कारणे असली तरी त्यात स्वातंत्र्य व जबाबदारीची जाणीव टाळली जाते.

माणसाने रूढीप्रमाणे वागावे असे अनेकवेळा म्हटले जाते. पण त्यातही जबाबदारी टाळण्याचा संभव जास्त आहे. कोणती रूढी योग्य व कोणती अयोग्य याचा विचार करण्याची जरूर असते. तसा न करता वागणे म्हणजे जबाबदारी टाळणेच होय. अनेक व्यक्तिंच्या सारासार विचारातून रूढी निर्माण होतात. रूढी म्हणजे सामुदायिक शहाणपणाचे सार असेही म्हटले जाते. परंतु स्वतंत्र व्यक्तीला रूढी विरुद्ध वागण्याचे आपले स्वातंत्र्य टिकवावयाचे असते. मनाच्या लहरीप्रमाणेच रूढीवर विश्वास ठेवून कायदे पाळण्यास तयार होणे धोकादायक आहे.

याचा अर्थ सर्व कायदे मोडलेच पाहिजेत असा नाही. परंतु मनाची लहर किंवा रूढी यापेक्षा कायद्याचे बंधन जास्त घट्ट असावे काय ? सर्वच कायदे चांगले आहेत असे समजण्यास कारण काय ? म्हणून कायदा चांगला आहे की नाही हे ठरविण्याची जबाबदारी पण व्यक्तिचीच आहे.

सवय म्हणून कायदा पाळणारी व्यक्ति, किंवा काहीही विचार न करता कायदा पाळणारी व्यक्ति या दोहोपेक्षा कायदेभंग करणारांना कायद्याची जास्त कदर असते. एखाद्या कायद्याचा उद्देश काय किंवा तो कोणत्या संदर्भात केला गेला याचा विचारही न करता तो पाळणारांना, ज्या गोष्टीकरता कायदा केला जातो त्याबद्दल विधिनिषेधही असत नाही. त्या उलट एक विशिष्ट कायदा मोडणारा नागरिक त्याबद्दल संपूर्ण विचार करूनच मग वागतो.

कोणता कायदा मानावा व कोणता मोडावा हे ठरविणे सोपे नसते. आपल्याला नैतिक मूल्ये पाळणारे जबाबदार नागरिक म्हणून वागावयाचे असेल तर खालील चार नियम महत्त्वाचे आहेतः—

( १ ) कायद्याला संशयाचा फायदा द्यावा. आपल्यापेक्षा कायदा ज्यानी केला ते लोक शहाणे आहेत असे धरून चालावे. म्हणून कायदा मोडण्यापूर्वी तो चूक आहे हे सिद्ध करण्याची जबाबदारी आपली आहे असे समजावे. इतरांचा सल्ला घेतला तरी निर्णय घेण्याची वैयक्तिक जबाबदारी आपण टाळू नये.

( २ ) कोणत्याही कायद्याबद्दल मत बनविताना तो कशा पद्धतीने अस्तित्वात आला ते विचारात घ्यावे. लोकशाही तत्त्वावर विश्वास असलेल्या व्यक्तिच्या दृष्टीने, लोकशाही धाब्यावर बसवून केलेला कायदा संशयास्पदच असणार. तो मोडण्यास तो चटकन








तयार होईल. एखाद्या हुकूमशहाने केलेला कायदा तर पाळण्याचेही बंधन त्याचेवर रहाणार नाही.

(३) कायद्यात नैतिकदृष्ट्या दोष असल्यास तो कोणत्याही पद्धतीने अस्तित्वात आला असला तरी तो मोडणे अपरिहार्य होईल. आपल्या मुलांच्या बाल-मनात येणारे वेडेवाकडे विचारसुद्धा सत्ताधीशांना सांगावे अशा तऱ्हेचा कायदा लोकशाही मार्गाने अस्तित्वात आणला गेला तरी तो मोडणे योग्य होईल. अनेक हुकूमशहांनी दडपशाही कायदे तथाकथित लोकशाहीमार्गाने अस्तित्वात आणले आहेत.

(४) कायदा मोडणाऱ्या व्यक्तींने आपल्या कृत्याचे परिणाम नुसते स्वतः पुरतेच तपासून न पहाता त्याचा समाजावर काय परिणाम होईल हे कायदा मोडण्या-पूर्वीच तपासावयास पाहिजे. आपले अहिंसक कृत्य हिंसात्मक चळवळ सुरू करणार नाही याची काळजी घेणे जरूर आहे. सत्याग्रहाच्या चळवळींनी हिंसक रूप धारण केल्यामुळे गांधींनी कायदेभंग मागे घेतल्याची पुष्कळ उदाहरणे आहेत.

या चार गोष्टींचा विचार करून जर एखादा कायदा मोडावा असे वाटले तर त्यासाठी चळवळ उभारणे हे आपले कर्तव्य ठरते. आपल्या मनाला जे पटते ते केल्याखेरीज राहू नये असे नैतिक तत्त्वज्ञांचे मत आहे. काय बरोबर आहे व काय चूक आहे हे ठरविण्याचे स्वातंत्र्य प्रत्येक व्यक्तीस मिळाले तर त्यातून अराजक माजेल असे सांगितले जाते. पण व्यक्तीचे मत हाच जर समाजाचा मानदंड नसेल तर तो समाज स्वतंत्र राहील का ? एखादा सत्ताधीश किंवा समूह काय चूक व काय बरोबर हे ठरवू शकेल का ? व त्यांना जर सर्वसत्ता दिली तर त्यातून नैतिक मूल्ये जोपासली जातील का ?

एखाद्या समाजात फार मोठ्या प्रमाणात कायदेभंगाची चळवळ सुरू झाल्यास त्या समाजात काही तरी मूलभूत बिघाड झाला आहे असे समजावे. सामाजिक स्थैर्य हे अंतिम मूल्य होऊ शकत नाही. ते स्थैर्य कशा प्रकारचे आहे ते महत्त्वाचे आहे.

जे कायदे चुकीचे आहेत ते बदलण्याकरता कायदे-शीर इलाज योजावेत असे म्हटले जाते. परंतु एक तर असे इलाज बहुसंख्य जनतेच्या अवाक्याबाहेर असतात व दुसरे म्हणजे काही सामाजिक दोष इतके भयंकर असतात की नुसते कायदे बदलूनही ते नाहीसे होत नाहीत. त्यासाठी समाजात आमूलाग्र बदल होण्याची गरज असते.

पुष्कळवेळा शासनीय व न्यायालयीन संस्था सुद्धा कायद्याला पाहिजे तशी मुरड घालताना दृष्टीस पडतात. सत्ताधीशांचे हात बळकट करणे हाच त्यात हेतु असतो. अशा वेळी सामान्य जनतेस कायदेभंगाखेरीज दुसरा इलाजच नसतो. काही वेळा समाजाच्या जीवनात असे काही क्षण येतात की त्याला धक्के देऊन जागे करावे लागते.

व्यक्तीला स्वतःच्या जबाबदारीची जाणीव होणे यावरच माणसाच्या नैतिक प्रगतीची मुळे व फळे अवलंबून आहेत. सविनय कायदेभंगाच्या चळवळी-इतकी वैयक्तिक जबाबदारीची जाणीव माणसाला अन्यत्र क्वचितच होत असेल.

मलफोर्ड सिब्ली,

प्राध्यापक राज्यशास्त्र, युनिव्हरसिटी ऑफ मिनोसोटा, यु. एस्. ए. – रोटेरिअन–मे १९६६

## कायदेभंग–धोका ?

मानवांचा इतिहास म्हणजे प्रगतिपथ तयार करण्यासाठी झगडणाऱ्या व्यक्तींच्या श्रमाचा, अश्रूंचा दुःखाचा इतिहास होय. अमेरिकेचा इतिहास याला अपवाद नाही. आमची राजकीय व सामाजिक जीवन-पद्धती, यादवी युद्धातून सहीसलामत बाहेर पडली. हा उदात्त जीवनप्रयोग असाच वाढेल व टिकून राहील अशी खात्री वाटते.

अमेरिकन समाजरचना कायद्यावर आधारलेली व कायद्याच्या कक्षेत रहाणारी आहे. अशा तऱ्हेची समाजरचना म्हणजे मानवी स्वातंत्र्याच्या लढ्याने गाठलेले उत्तुंग शिखर होय. मानवांच्या भविष्याचे ते आशास्थान आहे. म्हणूनच ती टिकविण्याची प्रत्येक नागरिकाची जबाबदारी आहे. अब्राहॅम लिंकन यांचे म्हणण्याप्रमाणे "प्रत्येक अमेरिकन नागरिकाने, स्वातंत्र्याच्या भक्ताने व समृद्धीच्या चहात्याने, अमेरिकन राज्यक्रान्तिची शपथ घेऊन कोणत्याही प्रकारे अमेरिकन कायद्याला धक्का लागू न देण्याची प्रतिज्ञा केली पाहिजे. कायदा मोडणाऱ्या प्रत्येक नाग-रिकाला आपण आपल्या पूर्वजांशी प्रतारणा करीत










असून आपल्या मुलाबाळांच्या स्वातंत्र्यास पायदळी तुडवीत आहोत याची जाणीव झाली पाहिजे. कायद्याविषयीच्या आदराचे बाळकडूच, मातांनी मुलांना पाजले पाहिजे, शाळा कॉलेजातून तेच शिकविले पाहिजे, बाराखडीच्या पुस्तकापासून ते तत्त्वज्ञानाच्या ग्रंथापर्यंत सर्वत्र ते छापले गेले पाहिजे, प्रार्थना मंदिरातून, विधानसभातून त्याचा प्रचार झाला पाहिजे, न्यायालयात त्यांचे कसोशीने पालन झाले पाहिजे; सर्वधर्मांच्या, सर्व वर्णांच्या, सर्व प्रकारच्या नागरिकांना ते मुखोद्गत झाले पाहिजे. ''

"कोठलाही समाज आपल्या नागरिकांना कायदे मोडण्याचा अधिकार देऊ शकत नाही. कोठलाही कायद्याचा मसुदा 'आपली हरकत नसल्यास' या शब्दांनी सुरू होऊ शकत नाही. कोठल्याही कायद्याच्या अमलबजावणीचे बाबतीत हें करावयाचे नसल्यास ते करावे, ते करावयाचे नसल्यास दुसरे काही करावे असे कोणी म्हणू शकणार नाही.

मग आताच आपल्याला काय झाले आहे? ज्याबद्दल कधीही शंका आली नाही व जे आपले कर्तव्य आहे असे आपण समजत आलो त्याचा पुनरुच्चार करण्याची गरज का वाटू लागली? नागरिकांचे कर्तव्य काय? नैतिकदृष्ट्या जागृत असलेल्या नागरिकाने, समाजाने न गाठलेले ध्येय गाठण्यास जरूर झटले पाहिजे. ज्या नागरिक बांधवाना कोणत्याही कारणामुळे समाजात योग्य व समान पातळीवर वागवले जात नाही त्यांना तशा प्रकारची संधी मिळवून देणे हे प्रत्येक नागरिकाचे कर्तव्यच आहे.

माणसातील अमानुषता नष्ट करणे सोपे नाही. अमेरिकेतील वांशिक किंवा वर्णभेदामुळे निर्माण होणारा प्रश्न सोडविणे अत्यंत गुंतागुंतीचे व कठीण काम आहे. ज्याच्यात पुरेशी नम्रता नाही तेच लोक हा प्रश्न चुटकीसरसा सोडविण्याचा प्रयत्न करतील" या जस्टिस फ्रँकफ्युटर यांचे वाक्यात किती अर्थ भरला आहे हे सुज्ञांनी ओळखावे.

हिंसेमध्ये नवे काहीच नाही. मानवी हक्काचा प्रश्नही मध्यपूर्वेत, आफ्रिकेत व भारतासारख्या आशिआयी देशात आढळतो. जगातील दोन मोठे देश पोलादी वा बांबूच्या पडद्याआड दडलेले आहेत. अनेक वेळा सविनय कायदेभंगाचे रुपान्तर भयंकर हिंसेत झालेले दिसून येते.

सुसंस्कृत समाजाला कायदेभंगाचा धोका परवडणार नाही. हे अमेरिकेपुरतेच सत्य नसून सर्वांनाच लागू आहे. कायदेभंगाच्या चळवळीला अपयश येऊन कडवटपणा निर्माण होऊन किंवा चळवळीचा फोलपणा लक्षात येऊन प्रतिहल्ले होणे धोकादायक आहे. कोणत्याही व्यक्तीला किंवा समूहाला आपणच ठरविलेल्या कारणाकरता सूड घेण्याचा हक्क असू शकत नाही.

सूडाच्या कृत्यात अनेक वेळा निरपराधी लोकांचा बळी घेतला जातो. त्यातून आणखी प्रतिहल्ले होतात व त्यात आणखी निरपराधी माणसे गोवली जातात. आपल्यातील दोषांकडे लक्ष न देता ज्या पद्धतीमुळे आपण प्रगतिपथावर वाटचाल करीत आहोत त्या पद्धतीवरच हल्ला करण्यात काय अर्थ आहे? स्वतंत्र व मुक्त समाज निर्माण करणे हा एकच उपाय या गोष्टीवर आहे.

अमेरिकेतील जंगली समाजात, कायद्याच्या अभावांमुळे माजलेल्या गोंधळातून एक गोष्ट स्पष्ट झाली व ती म्हणजे संस्कृति व सुराज्य स्थापण्यास कायद्याची अत्यंत जरूर आहे. सुरवातीस अमेरिकेत स्थायिक होणाऱ्या धुरिणांनी, जंगलश्वापदांचा संहार करून वा पश्चिम सीमेवर बंदुकीच्या फेरी झाडून जंगलाचे नंदनवन बनवले नाही. कायद्याची योग्य अमलबजावणी व न्यायालयाचे अस्तित्व या दोन आधारावर त्यांनी नवी प्रचंड अमेरिका उभी केली. या दोहोंच्या आधारावरच सामान्य माणसांत नवराष्ट्र निर्माण करण्याची ताकद आली हे विसरून चालणार नाही.

परंतु अलीकडे काही पोकळ कल्पनांचा अमेरिकेत सुळसुळाट होत आहे त्याबद्दल काळजी वाटते. 'आताच्या आता स्वातंत्र्य', 'न्याय्य सविनय कायदेभंग' हे नुसते शब्दांचे सापळे आहेत. त्यात अडकणे सामान्य माणसास कठीण नाही. सर्वांना सारखे स्वातंत्र्य व न्याय हे पण असेच शब्दसापळे (Semantic traps) आहेत. असल्या शब्दांचा उपयोग आपले पुरोगामित्व सिद्ध करण्याकरता केला जातो.

'आताच्या आता स्वातंत्र्य' हे एक मृगजळ आहे. स्वतःच्या गुणांचा योग्य तो आविष्कार होण्यासाठी

स्वातंत्र्याची गरज असते. परंतु स्वातंत्र्य म्हणजे पूर्ण तत्त्व नव्हे. ते समाजाच्या चौकटीतच अस्तित्वात येऊ शकते. त्याला समाजाची बंधने असतात. न्याया-बद्दल पण तेच म्हणावे लागेल. कोठल्याही समाजाला आपले जीवन पायरी पायरीने, अशा तऱ्हेने उभारावे लागते की त्यात स्वातंत्र्य व न्याय यांची जोपासना होईल, ती वाढीस लागतील व त्याकरता झटणे प्रत्येकास शक्य होईल.

'उशीरा मिळालेला न्याय म्हणजे अन्याय' अशा तऱ्हेच्या घोषवाक्यांनी मोहीत होण्याची जरूर नाही. न्यायदानाला विलंब लागला म्हणून न्यायाविरुद्ध मोहीम उभारणे बरोबर होईल काय ? एखादी सामाजिक सुधारणा आतापर्यंत अमलात आली नाही म्हणजे कायदेशीररित्या ती अमलात आणण्याचे मार्ग संपले आहेत असेही नव्हे.

समतेची मागणी आपले वर्चस्व सिद्ध करण्याकरता करूनही चालणार नाही. कायद्याचे बंधन पाळणाऱ्या समाजात सर्वांना समानता मिळू शकेल. अशा समाजात मिळणारे स्वातंत्र्य हेच आपले ध्येय असू शकते. न्याय व स्थैर्य या दोहोत सरस कोणते असा प्रश्न उद्‌भवण्याची गरज नाही. कायद्यावर आधारलेल्या समाजात स्थैर्य असतेच असते.

लोकशाहीप्रधान घटनाबंधित समाजात हिंसात्मक कायदेभंगाला स्थान नाही. मग न्याय्य सविनय कायदेभंगाचे काय असा प्रश्न उपस्थित होतो. कायदेभंगाला सविनय, न्याय्य वगैरे विशेषणे लावून तो मान्य करणे योग्य होणार नाही. याहीपुढे जाऊन असे म्हणता येईल की, काही विशिष्ट हेतूने कायदा मोडल्या नंतर त्याला सविनय हे विशेषण शोभेल काय ? कोणत्याही कायद्याच्या विरुद्ध हेतुपुरःसर वर्तन करणे फौजदारी गुन्हा होतो. म्हणूनच 'न्याय्य सविनय कायदेभंग' या कल्पनेत परस्पर विरोधी गोष्टींचा अंतर्भाव होतो असे म्हणावे लागते.

या सर्व गोष्टींचा विचार बाजूस ठेवला तरीसुद्धा अमेरिकन किंवा त्यासारख्या कायद्यानुसार चालणाऱ्या व कायदा बदलण्याचे संपूर्ण स्वातंत्र्य असलेल्या समाजात सविनय कायदेभंगाची चळवळ बदसूर वाटते, त्या समाजात अशा चळवळीची गरज नाही असे वाटते. अशा समाजात कायदा म्हणजे न पुसता येणारी दगडावरील रेघ नसते व तो बदलण्याची पण पूर्ण संधी असते मग त्यात कायदेभंगाचा हक्क कसा मान्य करता येईल ? आतापर्यंत अमेरिकेच्या विधानसभेने अनेक-वेळा बदलत्या जगाची आव्हाने स्वीकारून कायद्यात योग्य त्या सुधारणा केल्या आहेत. कायद्यामुळे स्वातंत्र्याचे नुसते रक्षण करावयाचे अशीच नुसती कल्पना नसून, स्वातंत्र्याची क्षितिजे अव्याहत वाढवून त्याचा उपभोग जास्तीत जास्त लोकांना घेता येईल अशी परिस्थिती निर्माण करणे हेही काम त्यामुळे व्हावे असा अमेरिकन दृष्टीकोन आहे.

योग्य कारणाकरता केल्या जाणाऱ्या कायदेभंगास जनतेचा पाठिंबा मिळेलही. परंतु कायदेभंगाचा हक्क कायद्याने मान्य करणे धोक्याचे आहे. चांगल्या कारणाच्या उपयोगी पडावा म्हणून केलेला कायदा दुसऱ्या कोणताही कारणाकरता वापरला जाण्याची शक्यता फार असते. म्हणूनच कायद्याच्या बंधनात रहाणाऱ्या समाजाने स्वतःकरता निर्माण केलेली बंधने शिथिल करणे बरोबर होणार नाही.

कायदेभंगाचा हक्क मागताना नुसत्या नागरिक हक्काच्या मागणीचाच विचार करून भागणार नाही. पोलेरिस नौकेच्या जलावतरणाला विरोध असणारांचा विचार करा, लष्करा करता राखून ठेवलेल्या हद्दीत घुसण्याचा हक्क मागणारांचा विचार करा, फार काय अमेरिकेची लष्करी गुपिते फोडण्याचा हक्क मागणारांचा विचार करा. या सर्वांनीच सविनय कायदेभंगाचा हक्क आहे असे म्हणून वागण्यास सुरवात केली तर काय होईल याचा विचार केला पाहिजे.

फार मोठ्या प्रमाणात योजलेला सविनय कायदेभंग माणसातील हीन शक्तींना प्रोत्साहन देतो. कोणत्याही कारणाकरता एकत्र आलेल्या जनसंमर्दाचा तो नियम आहे. फुटबॉलच्या सामन्यास जमलेला जनसमुदाय सुद्धा आवाक्या बाहेर जाऊ शकतो, वाटेल त्या पातळीवर पोचू शकतो.

तात्पुरता इलाज म्हणून सविनय कायदेभंग करणे-सुद्धा बरोबर होणार नाही. एकतर तात्पुरत्या इलाजात काहीही अर्थ असत नाही व दुसरे म्हणजे कायदेभंगाची एक बाजू शोचनीय आहे तर दुसरी बाजू








म्हणजे नष्टत्वाकडे नेणारी आहे. समाजाची मदार विचार, जबाबदारी व आदर ( Reason, Responsibility and respect ) या तीन गोष्टींवर असावयास पाहिजे. त्यात मी म्हणतो तेच बरोबर हे म्हणण्याची प्रवृत्ति, कोणत्याही गोष्टींकडे डोळेझाक करण्याची सवय व निर्विकार तटस्थता या गोष्टींना स्थान असता कामा नये. समाजातील भेदाभेद नष्ट करून सर्वांना सारखाच न्याय व समान संधी मिळवून देणे हे आपले कर्तव्य आहे.

परंतु साधनाची शुद्धता आपण राखलीच पाहिजे. कायद्याचा मान पण राखला पाहिजे. नुसत्या तोंडाने कायदा फार चांगला असतो असे म्हणून भागणार नाही. काही काळ 'वकील' व काहीकाळ 'नागरिक' म्हणून वागता येणार नाही कायदेशीर अमलाखाली सर्वांचे स्वातंत्र्य कसे वाढेल व टिकेल या मूलभूत प्रश्नांचा अभ्यास केला पाहिजे; त्या संबधीचे आपले ज्ञान वाढवले पाहिजे.

मॉरिस लिबमन, वकील
शिकागो
— रोटेरिअन, मे १९६६

---





अनुक्रमणिका



नवा महाराष्ट्र
घडत आहे...

स्वयंपूर्णता हेच राष्ट्राचे खरे सामर्थ्य । शेती, उद्योगधंदे इत्यादींचे उत्पादन वाढवून देश स्वयंपूर्ण करण्यासाठी महाराष्ट्र राज्यातील प्रत्येक माणूस आज प्रयत्नशील राहिला पाहिजे. म्हणून आजची घोषणा —

# अधिक श्रम - अधिक उत्पादन

संचालक प्रसिद्धी विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई



